श्रीनारायणमहाराज जाल्वणकर ऊर्फ श्रीचिमटेबाबा यानीं देवास (सीनिअर)
येथें प्रस्थापिलेली काळ्या गडिकेची षड्भुजी–एकमुखी

## श्रीदत्तात्रेयाची स्वयंभू मूर्ति



॥ श्लोक ॥

अनुसूयात्रिसभूतो दत्तात्रेयो दिगम्बर ॥
स्मर्तृगामी स्वभक्तानामुद्धर्ता भवसंकटात ॥



॥ श्रीसद्गुरुभ्यो नमः ॥

# अर्पणपत्रिका

अनंत—कोटि—ब्रह्मांड—नायका श्रीदिगंबरा ॥
सनाथ करनी घ्यावें आपल्या दीन किंकरा ॥ १ ॥
तुमचा लाडका भक्त येकनाथ जनार्दन ॥
ओवीबद्ध तयाचें हें चरित्र अति पावन ॥ २ ॥
लिहिलें कृष्णदासानें कृपेनें आज आपुल्या ॥
मुद्रित प्रथमरूपाच्या वेषानें नटलें भल्या ॥ ३ ॥
तें आज तुमच्या पायीं वाहतों मी उपायन ॥
घ्यावें करोनिया गोड तोष—पूर्वक आपण ॥ ४ ॥
कवीनें कविता केली बुद्धि त्यातें तुम्ही दिली ॥
एकत्र भाररूपें ती तुम्हां सनिध आणिली ॥ ५ ॥
कर्तृत्व एवढें माझें भारवाहक दास मी ॥
मागतों चरणीं मान नित्य हा जीवित-क्रमी ॥ ६ ॥

॥ श्रीसद्गुरुचरणार्पणमस्तु ॥

# मंगलाचरण

आचार्यदेवो भव ।
आचार्यवान् पुरुषो वेदेति ॥



ॐकारस्वरूपा सद्गुरु समर्था ।
अनाथांच्या नाथा तुज नमो ॥

—श्रीएकनाथमहाराज

## ओंव्या

[ गुरुवर्य श्रीरामचंद्र शंकर टाकी ऊर्फ श्रीभाई हे पैठणला
श्रीएकनाथमहाराजाच्या दर्शनास गेल्यावेळी झालेल्या ]

सर्व साधनें समूळ सांडुनि । श्रीगुरूच सगुण सर्वेश्वर मानुनि ।
सिद्धदशा प्राप्त करुनि । घेतली तुवां ॥ १ ॥
म्हणोनि श्रीभागवताचा खरा अर्थ । प्रगट केलासि जो विशदार्थ ।
भगवद्भक्त झाले कृतार्थ । तत् श्रवणपठणें ॥ २ ॥
त्या तुझ्या टीकामृताचें पान । श्रीसद्गुरुसंनिध करवूनि जाण ।
शिकविलें त्वां सद्गुरुसेवन । कैसें करावें ॥ ३ ॥
त्याहीवरी आज देवोनि दर्शन । प्रेम वाढविलें श्रीएकनाथजनार्दन ।
तरी आतां अनन्यभावें नमन । करितों तुज ॥ ४ ॥

—श्रीशंकरसुधा

## अभंग

एकनाथदेवें करोनी गुरुभक्ती । साधीयली प्रीती जनार्दनीं ॥ १ ॥
जनीं वनीं जया एक जनार्दन । नाम अभिधान सार्थ केलें ॥ २ ॥
एकादशाचीये एकाकार टीका । जेणें कृष्णसखा तुष्ट केला ॥ ३ ॥
दत्तगुरुराया असे हे संमत । सद्भक्तिपंथ-दीपीका जे ॥ ४ ॥
धन्य जनार्दन धन्य एकनाथ । गुरुभक्तिपंथ स्थिर राखा ॥ ५ ॥

—श्रीमंगेशसुधा




“ परंपरा ही प्रेमळतेची ”—“ प्रेम नांदे जगात शांती ”



# आत्मनिवेदन

एकनिष्ठ गुरुभक्त श्रीएकनाथमहाराज यांच्या " प्रतिष्ठान–चरित्र " या ओंवीबद्ध दिव्य ग्रंथप्रकाशनाची सवा आमच्या हातून होण्याचा सुयोग परमपूज्य गुरुवर्य श्रीमाईंच्या ( श्रीटाकीमहाराजांच्या ) विशेष कृपेनें आम्हांला जो लाभला त्याबद्दल धन्यता वाटते. हा अपूर्व योग आमचे सांगलीचे प्रियबंधु गु. म. प. गुरुभक्तिपरायण रघुनाथ हणमंत ऊर्फ श्रीबाबुरावजी कोटनीसमहाराज यांच्या दयेनें घडून आला आणि त्याबद्दल आम्ही त्यांचे अंतःकरणपूर्वक आभार मानतों. श्रीबाबुरावजींचा व आमचा जन्मांतरींचा प्रेम-ऋणानुबंध असला पाहिजे, यांत संशय नाहीं. एऱ्हवीं सांगलीसारख्या दूरांतरित स्थळापासून आमच्या संस्थेला वरचेवर भेट देणें, संस्थेच्या कार्यास हरएकप्रकारें तनुमन वेंचणें, फार काय, श्रीनिरंजन-



र. ह. कोटनीस

रघुनाथ स्वामींच्या संबंधीं अस्सल माहिती उपलब्ध करून आणि त्यांच्या संबंधींच्या अनेक पावन वस्तु आणि ग्रंथ आमच्या संस्थेस उदार मनानें देऊन टाकणें, अशा गोष्टी घडल्याच नसत्या. ( 'सद्भक्ति–प्रकाश,' वर्ष १७; सं. अं. १०–१२ व वर्ष १८, सं. अं. ४–९ पहा. )

श्रीनाथांच्या नांवावर पुष्कळच गोष्टी प्रसिद्ध आहेत; त्यांतील खऱ्या कोणत्या आणि दंतकथा कोणत्या हें आज निश्चितपणें सांगतां येण्यासारखें नाहीं.

तथापि इतर साधुसंतांच्या चरित्रांसबधी प्रचलित असलेल्या गोष्टी भाविकांच्या श्रद्धेला एकप्रकारें पोषक होत असतात. तसाच प्रकार श्रीनाथांच्या चरित्रांतील अनेक गोष्टींसंबंधीं म्हणतां येईल आजच्या बुद्धिनिष्ठ काळात संत–चरित्रांतील अद्भुत गोष्टींवर विश्वास ठेवण्याची प्रवृत्ति जवळजवळ नाहींशीच झालेली आहे तथापि, श्रीसमर्थांनीं दासबोधांत म्हटल्याप्रमाणें संतांचें सामर्थ्य " **मार्गें चाले कां जे पुण्यमार्गें चालले । म्हणौनिया ॥** " आजच्या चिकित्सक तर्ककर्कश बुद्धीलाही चकीत करून टाकणाऱ्या घटना आजही क्वचित् विद्यमान असलेल्या आढळतात श्रीक्षेत्र ब्रह्मनाळ येथें होणारा समाधीचा डोल हा एक उदाहरण म्हणून सांगता येईल खुद्द श्रीनाथांच्या रांजणाचा प्रकार तर याहूनही विस्मयजनक असून त्यानें मोठमोठ्या विद्वानांची तर्कशक्ती कुंठित करून टाकलेली आहे असल्या घटनांचें एऱ्हवी फारसें महत्त्व नसलें तरी संतांच्या विषयीं आदराची व भक्तीची भावना जागृत ठेवण्यास त्या निःसंशय उपयोगी पडतात

संतांच्या चरित्राप्रमाणें संतांचें लिखाणही भाविक अभाविक सर्व प्रकारच्या वाचकांना वेगवेगळ्या प्रकारानें उद्बोधक झाल्यावांचून रहात नाहीं त्यांच्या ग्रंथांतून तत्कालीन समाजस्थितीची चांगल्याप्रकारें कल्पना उमटलेली असते कित्येक वेळां ऐतिहासिक सत्यावर प्रकाश टाकण्यास त्यांचें लेखन फार उपयोगी पडतें. ' श्रीकृष्णाचे सद्गुरु कोण ? ' हा एक विवाद्य विषय बरेच दिवस चिकित्सक वाचकांच्या बुद्धीला गुंग करून टाकीत होता साधकबाधक उलटसुलट प्रमाणें पुढें करण्यांत येत होतीं, पण श्रीनाथांच्या लेखणीनें या विषयावर विदारक प्रकाश टाकून या विषयाचा सोक्षमोक्ष केला असें आता म्हणण्यास हरकत नाहीं. श्रीनाथ आपल्या ' ज्ञानदलहरी ' या छोट्याशा पण गुरुभक्तिरसानें ओथबलेल्या ग्रंथात म्हणतात —

" पूर्णब्रह्म श्रीकृष्णनाथ । तोही म्हणवी गुरुभक्त । दुर्वास याची सेवा करित । नित्यमुक्त यालागीं ॥ १ ॥ ब्रह्मपदाचा अधिकारी । म्हणवूनि विधातें उद्धरी । स्मरणमात्रें दुरितें हरी । तो श्रीहरी गुरुभक्त ॥ २ ॥ "

वरील विषयावर श्रीमंगेश रामचंद्र टाकी ऊर्फ श्रीदादाभाई यांनीं 'श्रीकृष्णांचे सद्गुरु श्रीदुर्वास' | *या नांवानें एक स्वतंत्र प्रबंधच लिहिला असल्या- मुळें त्याविषयीं येथें अधिक लिहिण्याची जरुरी नाहीं. सारांश, संतचरित्रांकडे पाहण्याचा भाविकपणा एवढा एकच दृष्टिकोन नसून त्याचा उपयोग अनेक दृष्टिकोनानीं करून घेता येण्यासारखा असतो आणि म्हणूनच आम्ही या नवीन उपलब्ध झालेल्या श्रीनाथचरित्राकडे सर्व प्रकारच्या महाराष्ट्रीय वाचकांची दृष्टी वेधून घेऊं इच्छितों.

एकादशीपासून षष्ठी ही अकरावी तिथी येते. फाल्गुन वद्य षष्ठीस श्रीएक- नाथमहाराजांचें श्रीवैकुंठारोहण झालें. महाराजांच्या परंपरेंत या षष्ठीचें थोर माहात्म्य असून श्रीभागवतांतील पुढील ओंव्यांत महाराजांनीं त्याचें स्पष्टीकरण केलें आहे:—

" वद्य षष्ठी फाल्गुन मास । श्रीजनार्दन जन्मदिवस । दत्तात्रय दर्शन विलास । प्राप्त त्यास तेचि दिनीं ॥ आम्हांसीं जनार्दनाची भेटी । झाली तेव्हां हेचि षष्ठी । त्याचि योगें अभिनव दृष्टी । सर्व सृष्टी अद्वयत्वें॥ श्रीजनार्दन स्वच्छंद- गती । येचि दिनीं देहाकृती । लोपोनियां सुखस्थितीं । निजधामाप्रती पैं गेला ॥ चारी पर्वं निश्चित । उत्साह करणें उचित । जाणोनियां यथास्थित । करावें उचित साहित्या ॥ पांचवें पर्व याच दिनीं । होतां पुढें देखसी नयनीं । षष्ठी पंच पर्व श्रेणी । विख्यात जनीं भावार्थीयां ॥"

बहु भाग्यानें आम्हांला या ग्रंथप्रकाशन—प्रसिद्धीसही षष्ठी तिथी लाभली आहे त्याबद्दल धन्यता वाटते. श्रीएकनाथस्वामींचे वंशज ह. भ. प. शामराव लक्ष्मणबुवा गोसावी, विद्यमान मठाधिपति, पैठण, यांनीं ह. भ. प. बाबुरावजी कोटनीस यांजपाशीं प्रस्तुतच्या ग्रंथाची प्रकाशन—प्रसिद्धि सांगलीस श्रीकैवल्य- धामांत व्हावी अशी आपली सदिच्छा प्रगट केली व त्यांना त्याचें अनुमोदनही मिळालें. ह. भ. प. मठाधिपतींनीं प्रस्तुत ग्रंथ छापून काढण्यास कोणत्याही प्रकारचे आढेवेढे न घेता निस्पृहतेनें तो मोठ्या आनंदानें आमचे स्वाधीन केला.

* मिळण्याचा पत्ताः—ट्रिनिटी पब्लिसिटी सोसायटी, श्रीशंकर लॉज, सरस्वती बाग, जोगेश्वरी ( मुंबई ). किंमत रु०-८-०

आम्हांला याप्रकारें त्यांनी व हें सर्व घडून आणण्यास व ग्रंथाची मुद्रणालयासाठीं प्रत तयार करण्याच्या बाबतींत ह.भ.प. बाबुरावजी यांनीं मनस्वी श्रम घेऊन कायमचें ऋणी करून ठेविल्यामुळें, आमचे विचार कांहीं असले तरी त्यांच्या शब्दाबाहेर जाणें अम्हांला शक्यच नव्हतें. तरी या उभयतांनीं ठरविल्याप्रमाणें प्रकाशन प्रसिद्धीचा मंगलयोग सांगलीस कैवल्य-धामांत आज शनिवार ता. ३१-१-१९४८ रोजीं अर्थात् परमपूज्य सद्गुरु श्रीहणमंत पांडुरंग ऊर्फ श्रीतात्यासाहेब कोटनीसमहाराज यांच्या पुण्यतिथीदिनीं जमून आला आहे. या चरित्राच्या प्रकाशन-योगांत श्रीनारायणमहाराज जालवणकर, श्रीरामचंद्रराव महाराज-चिमडकर आणि श्रीएकनाथमहाराज पैठणकर अशा तीन सत्पुरुषांच्या संप्रदायांचा नैमित्तिक मिलाफ त्रिवेणीसारखा झाला असून तो भाविकांना मोठा सूचक वाटेल यांत शंका नाहीं ! असो.

राजकवी ह. भ. प. साधुदास यांनीं या 'प्रतिष्ठान-चरित्रा'तील कठीण व अपरिचित शब्दांवर टीपा देऊन व इतर महत्त्वाच्या टीपा देऊन ग्रंथाची उपयुक्तता निःसंशय वाढविली आहे. प्रस्तावनेंत ग्रंथांतील कांहीं नवीन मुद्यांचें स्पष्टीकरण करुन त्यांवरही त्यांनी चांगलाच प्रकाश पाडला आहे.

राजकवींनी वेळातवेळ काढून अत्यंत परिश्रमानें श्रीएकनाथमहाराजांची ही परमपावन वाङ्मयसेवा निष्कामतेनें केल्याबद्दल आम्ही त्यांचे अंतःकरणपूर्वक आभार मानतों. इतकेंच नव्हे तर ग्रंथाची शुद्ध प्रत तयार करण्यास त्यांनीं व ती छापखान्यासाठीं व्यवस्थितपणें लिहून काढण्यास ह. भ. प. बाबुरावजी यांनीं अत्यंत परिश्रम घेतले आहेत व त्याबद्दल आम्ही या उभयतांचे फार ऋणी आहोंत.

या 'प्रतिष्ठान-चरित्रा'ची उपलब्धी, त्याचें संपादन, त्याचें लेखन वगैरेंचे बाबतींत ह. भ. प. बाबुराव कोटनीस व ह. भ. प. साधुदास यांनीं जे कष्ट घेतले—जी मदत दिली तिचा उल्लेख कृतज्ञतापूर्वक वर करण्यांत आलाच आहे. त्याशिवाय विद्यमान मठाधिपती ह. भ. प. शामराव लक्ष्मणबुवा गोसावी यांनीं प्रस्तुत ग्रंथ छापून काढण्यास संमति दिल्याबद्दल आम्ही त्यांचे अत्यंत ऋणी आहोंत. त्याचप्रमाणें श्रीएकनाथ महाराजांच्या भाविक भक्तांनीं, ज्यांचा उल्लेख अन्यत्र झालाच आहे, आपल्या संग्रहीं असलेल्या पादुका वगैरेंची छायाचित्रें

घेण्यास ह. भ. प. बाबुरावजी कोटनीस यांना परवानगी दिल्याबद्दल आम्ही या सर्वांचे कृतज्ञतापूर्वक आभार मानतों शेवटी, 'फमस प्रिंटर्स'चे मालक श्री. वासुदेवराव भट व श्री. गोपाळराव पाटकर या उभयतांनीं विशेष महनत घेऊन हें काम कसोशीनें केलें नसतें तर हा ग्रंथ आम्हीं योजिल्याप्रमाणें श्र दत्तजयतीस प्रभूचरणीं समर्पण करण्यास आम्हास कधींच मिळाला नसता. ग्रंथ वेळींच आणि अत्यत काळजीपूर्वक छापून दिल्याबद्दल व एकदर छपाईचें काम टापटिपीनें अति सुंदर करून दिल्याबद्दल आम्हीं त्यांचे फार फार आभारी आहोत.

गोरखपूरच्या सुप्रसिद्ध गीता–प्रेसनें छापलेलें श्रीएकनाथमहाराजांच तिरंगी छायाचित्र, जें आरभी दिलेलें आह व ज्याचा छोटासा ब्लॉक करून तो मुख-पृष्ठावर दिला आह त्याबद्दल सदर प्रेसचहीं आम्हीं अत्यत आभारी आहोत

वरील चार शब्दास ' आत्मनिवेदन ' ही सज्ञा दिली गेली असल्यामुळें स्वत बद्दलचा यथें मुळींच उल्लख न केला तर हें निवेदन अपुरें ठरेल असे वाटल्यावरून वाचकांना आमचा अल्प परिचय करून देत आहों.

आमची ' ट्रिनिटी पब्लिसिटी सोसायटी ' ही ' सद्धक्ति–प्रसारक–मंडळी'ची ग्रथप्रकाशन करणारी एक शाखा असून तिच उद्दश मडळीच्या 'सद्धक्ति-प्रकाश' मासिकांत जे प्रसिद्ध झाले आहेत, त्यांतील पुढील दोन प्रमुख होत —

१ " ज्या साधुसतांनीं व सत्पुरुषांनीं भागवतधर्माचें आचरण करून त्याचा प्रसार केला, आणि चित्तशुद्धि करण्याच्या इतर मार्गांपेक्षा भक्तिमार्ग किती श्रेष्ठ आहे हें जगांत जाहीर केलें, त्यांची चरित्रें आणि त्याचे ग्रंथ प्रसिद्ध करणें, आणि त्यांच्या सन्मानार्थ योग्य स्मारकें स्थापणें.

धर्म व तत्त्वज्ञानपर पुस्तकें, मासिकें, वगैरे छापून प्रसिद्ध करणें "

या धोरणांस अनुसरूनच आम्हीं प्रस्तुत ग्रंथाच्या प्रकाशनाचें काम हातीं घेतलें आणि तें श्रीदत्तकृपेनें आमच्या सकल्पानुरूप श्रीदत्तजयतीदिनीं तयार झालेलें पाहून अत्यत समाधान वाटत आहे (सत्य सकल्पाचा दाता नारायण। सर्व करी पूर्ण मनोरथ ॥ तुकाराममहाराज )

आता 'ट्रिनिटी' म्हणजे त्रिमूर्ती अर्थात् ब्रह्मा विष्णु-महेश जे अनुक्रमें मूर्तिमंत ज्ञान-भक्ति-वैराग्य होत. या त्रिमूर्तीशिवाय सद्भक्ति किंवा गुरुदेवभक्ति होणें अगदीं अशक्य आहे आणि या सद्भक्तींत तर या त्रयीचें ऐक्य होत असल्यामुळें ( **भक्तिः परेशानुभवो विरक्तिरन्यत्र चैष त्रिक एक कालः।** श्रीभागवत ) शेवटीं या दोन्ही भगिनी अर्थात् 'ट्रिनिटी' व 'सद्भक्ति' एकरूपच होतात.

सद्भक्ति-प्रसारक-मंडळींनीं प्रसिद्ध केलेल्या पुस्तकांचा सत्वर प्रसार व्हावा या हेतूनेंच ही ट्रिनिटी पब्लिसिटी सोसायटी इ. स. १९३४ मध्यें अर्थात् गुरुवर्य श्री भाईंच्या हयातींतच त्यांचे द्वारा गुरुवर्य श्रीशंकर त्र्यंबकेश टाकी ऊर्फ श्रीबाबा ( श्रीभाईंचे पिता व सद्गुरु ) यांची परवानगी घेऊन स्थापन करण्यांत आली.

*सद्भक्ति-प्रसारक-मंडळी ही सांप्रदायिकांकरिता खरी, परंतु सार्वजनिक सेवेला* वाहिलेली आहे. संस्थेला आतां सर्वस्वी आधार परमपूज्य सद्गुरु श्रीमंगेश रामचंद्र टाकी ऊर्फ श्रीदादाभाई यांचा असून त्यांच्याच कृपाप्रसादानें संस्था आपलें उद्दिष्ट कार्य आतांपर्यंत यथाशक्ति पार पाडीत आली आहे. या 'प्रतिष्ठान-चरित्रा'च्या प्रकाशनापर्यंत...हा ग्रंथ सर्वांगसुंदर व्हावा या हेतूनें प्रथमपासून श्रीदादाभाईंनी आम्हांस वेळोवेळीं ज्या उपयुक्त सूचना दिल्या व आमच्या नम्र परंतु अत्याग्रहाच्या विनंतीस मान देऊन आपल्या शरीरस्वास्थ्याकडे न पाहतां आपला अमूल्य वेळ खर्चून ह्या ग्रंथास उपोद्घात लिहून दिला त्याप्रीत्यर्थ त्यांचे आभार मानण्याचे निष्फळ प्रयत्न न करितां, त्यांचे चरणीं भक्तिपूर्वक प्रणाम करून ही ग्रंथप्रकाशनसेवा जनता–जनार्दनापुढें सादर करणें आम्हांस श्रेयस्कर वाटतें.

शेवटीं, हें लांबलेलें 'निवेदन' ज्या श्रीसद्गुरुरायांच्या केवळ कृपाप्रसादें लिहिलें गेलें त्यांच्याच परमपावन दिव्यचरणीं तें अतिनम्रभावें अर्थात् सर्वात्मभावें समर्पण करून विलीन होतों.

प्रकाशक
ट्रिनिटी पब्लिसिटी सोसायटी,
भीमशंकर लॉज, सरस्वती बाग, जोगेश्वरी, मुंबई.

प्रकाशन-प्रसिद्धि :
'कैवल्य-धाम', सांगली.
श्रीहनुमंतषष्ठी,
दि. ३१-१-१९४८

सांगली येथील सुप्रसिद्ध वकील व चिमड सम्प्रदायांतील थोर संतविभूति,]

ब्रह्मीभूत श्रीहणमंत पांडुरंग

ऊर्फ

## श्रीतात्यासाहेब कोटणीस महाराज



| जन्म : | निर्याण : |
|---|---|
| कार्तिक शु ८ शक १७८६ | पौष व० ६ शक १८५५ |
| दिनांक ७-११-१८६४ | दिनांक २७-१-१९३४ |

श्लोक

गुरुभजनविधानीं वेंचिलें आयु सारें ।
गृहविभवसुतादी तुच्छ केले पसारे ॥
वरि सहजसमाधि-ध्यान रात्रंदिसा रे ।
पुनरपि हनुमंत व्यक्त आला असा रे ॥

—साधुदास

ब्र० श्रीतात्यासाहेब कोटनीस महाराज

यांचे सुपुत्र व सच्छिष्य

## गु. भ. प. रघुनाथ हणमंत ऊर्फ श्रीबाबुरावजी कोटनीस महाराज

[ संस्थापक, "कैवल्य–धाम", सांगली ]



"... 'प्रतिष्ठान-चरित्र' या ओंवीबद्ध दिव्य ग्रंथप्रकाशनाची सेवा आमच्या हातून होण्याचा सुयोग ...आमचे सांगलीचे प्रियबंधु गु. भ. प. रघुनाथ हणमंत ऊर्फ श्रीबाबुरावजी कोटनीसमहाराज यांच्या दयेनें घडून आला..."

—'आत्मनिवेदन' (पृष्ठ १)

॥ श्रीसद्गुरु प्रसन्न ॥



॥ गुरुः साक्षात्परब्रह्म तस्मै श्रीगुरवे नमः ॥

# उपोद्घात

प्रकाशक – ट्रिनिटी पब्लिसिटी सोसायटी यांच्या विशेष कळकळीच्या आग्रहा-मुळेच प्रस्तुतचें ' प्रतिष्ठान–चरित्र ' या दिव्य ग्रंथावर चार शब्द लिहिण्याचें मला पत्करावें लागलें. भक्तिरसानें ओथंबलेल्या या परमपावन ग्रंथासंबंधीं बोलण्याला मी अगदीं अनधिकारी आहें आणि हें मला येथें प्रांजळपणें कबूल केलें पाहिजे. श्रीवामन-पंडितांच्या वचनात सांगावयाचे झाल्यास —"हें बोलीं काय बोलावें । शिकविणारें काय शिकवावें । प्रेमें भजोनि पहावें । झरा लागतां फुटती उकळ्या आपोआप ॥" असा येथील प्रकार असल्यामुळें आणि वास्तविक पाहता तो,—"साख-रेची गोडी केवीं लाभे बोलीं । जंव नाहीं घेतली चवी तेची ॥ " ( श्रीमंगेश-सुधा ) या नियमाला धरूनच असल्यानें या विषयावर कांहीं न बोलणें—कांहीं न लिहिणेंच इष्ट होईल (गुरोस्तु मौनं व्याख्यानं शिष्यास्तु छिन्न संशयाः ।). परंतु, प्रकाशकांच्या भिडेला वश होऊन दोन वेडेवांकडे शब्द लिहिण्याचा मी प्रयत्न करीत आहें ( वेडेवांकुडे गाईन । परि तुझा म्हणवीन ॥ तुकाराममहाराज ). तरी दयाळु सद्गुरुमाउली—"बोलूं जातां बरळ करिसी तें नीट । " या श्रीतुकाराममहाराजांच्या उक्त्यनुरूप तें सारें सुधारून नेईल या दृढ विश्वासावरच हें धाटर्य मी केलें आहे ( भेडी लाज धीट केलों देवा ॥ तुकाराममहाराज ).

प्रस्तुत ग्रंथांत वर्णिलेल्या श्रीगुरुभक्तीची थोरवी गाताना महाशय ग्रंथकार एका ओंवींत स्पष्ट म्हणतातः—

"वेदाचा वक्ता गुरु जो नारायण । त्यासही नकळे भक्तीचें महिमान ।
मा वेदासी कैसेनि होइल प्रमाण । आलक्ष जाण श्रुतिशास्त्रा ॥"

भक्तिरहस्य प्रत्यक्ष श्रीनारायणालाच अवगत झालें नाहीं, तें वेदशास्त्रांना कोठून होणार ? मग तेथें आमच्यासारख्या सामान्य माणसाचा काय पाड ? असो.

या 'प्रतिष्ठान-चरित्रा'च्या बाबतींत घ्यानात धरण्यासारखी अति महत्त्वाची गोष्ट म्हटली म्हणजे श्रीएकनाथमहाराजासारखे प्रत्यक्ष श्रीविष्णूचे अवतार हे चरित्रनायक असून श्रीकृष्णदास जगदानंद-नदनासारखे अधिकारसंपन्न हे चरित्रलेखक होत असा हा परस्पर अपूर्व योगायोग जुळून आल्यावर मग तेथें प्रस्तुतच्या सारखें अलौकिक चरित्र निर्माण झाल्यास त्यात नवल तें काय ? सामान्यत चरित्रनायक जरी अलौकिक असला तरी चरित्रलेखक हा अधिकारसपन्न मिळणें अतिदुर्लभ असतें आणि अशा अधिकारसंपन्न पुरुषानें चरित्र-लेखनाचें काम हातीं घेतल्याशिवाय ग्रथ सर्वांगसुदर होणें फार कठीण आहे. श्रीरामकृष्णाच्या 'सेंटॅनरी मेमोरीअल एडीशन'मध्यें या विषयावर एक अति महत्त्वाचा लेख आला असून तो इतका सुदर लिहिला गेला आहे कीं, त्याच्या मराठी रूपांतरांत वाचकाना तो येथें थोड्या विस्तारानेंच सादर करीत आहें.—

"हें चरित्र जरी इतकें साधें होतें, तरी पण त्यात घडलेले प्रसग इतके महत्त्वाचे व उद्बोधक होते, त्यातील गोष्टी इतक्या रहस्यमय होत्या कीं, साधारण चरित्र-लेखकाच्या बुद्धीला त्या आकलन होणें शक्यच नव्हतें. स्वामी विवेकानंदा सारख्या प्रतिभासपन्न पट्टशिष्याला देखील आपल्या गुरुवर्यांचें चरित्र लिहिण्याची आपली अपात्रता वाटू लागली. कारण, इतर सामान्य कोटींतील माणसांप्रमाणें श्रीराम कृष्णाच्या चरित्रातील प्रसंग बुद्धिगम्य नसून त्यात गूढ उदात्त तत्त्वें सामावलीं होतीं. त्याच्या जीवनाची महत्ता त्याच्या निगूढ अतर्गत मनोव्यापारावर अवलंबून होती. जरी त्यांची वागणूक इतर जनाप्रमाणें साधीच दिसत होती तरी पण त्या वागणुकीच्या कार्यकारणसंबधाचा उगम पहावयाचा असला तर त्याच्या खोल अंतःकरणाचा ठाव गाठला पाहिजे. त्यांच्या सर्व जीवनपटात आध्यात्मिक तत्त्वाचे उभे-आडवे ज्ञानतंतु विणलेले होते आणि म्हणूनच त्याच्या जीवनाचें रहस्य त्यांच्या इतक्याच उच्च मनोभूमिकेवर असलेल्या दिव्यदृष्टीच्या महात्म्यासच कळूं शकेल. साधारण मनुष्यानें त्याचें चरित्र लिहिण्याचा प्रयत्न करणें म्हणजे एखाद्या जन्माधानें दूध व बगळा यांचें वर्णसाम्य ऐकून दूध बगळ्याच्या चोंचीसारखें असतें, असें वर्णन करण्यासारखें होईल.

श्रीरामकृष्णांच्या पन्नास वर्षांच्या आयुष्यक्रमाचा इतिहास म्हणजे त्या अवधींतील हिंदुधर्माच्या आध्यात्मिक प्रगतीचाच इतिहास होय. त्यांच्या चरित्राची आध्यात्मिक-रीत्या पूर्ण ओळख करून घेण्यास चरित्रकारानें प्रथम स्वतः ह्या जीवितांचें कोडें सोडवून घेऊन पारमार्थिक उन्नति करून घेतली पाहिजे. ज्या प्रमाणांत चरित्रकाराची पारमार्थिक उन्नति होत जाईल, त्या प्रमाणांत त्या थोर विभूतीच्या आध्यात्मिक चरित्रावर अधिकाधिक प्रकाश पडूं लागेल.

सारांश, श्रीरामकृष्णाच्या दिव्य चरित्रांतील गोष्टी ह्या दृष्टिकोन ठेवूनच आकलन करण्याचा प्रयत्न केला पाहिजे तरच त्यांचें चरित्र साधारणपणें लेखणींतून उतरवितां येईल."

'प्रतिष्ठान-चरित्रा'चे लेखक श्रीकृष्णदास जगदानंद-नंदन हे कांहीं सामान्य कोटींतले नव्हते. ते फार अधिकारसंपन्न होते आणि हें सदर ग्रंथांतील त्यांच्या एकंदर निरूपणपद्धतीवरून स्पष्ट करून घेण्यासारखें आहे. यांचे सद्गुरु श्रीउद्धव हे असून श्रीकृष्णदास हे गुरुमहाराजांच्या पूर्ण कृपेला पात्र झाले होते, यांत संशय नाहीं; आणि म्हणूनच त्यांना ह्या ग्रंथ सद्भक्तांच्या—गुरुभक्तांच्या आदराला पात्र होईल, अशा प्रकारचाच भक्तिरसपरिप्लुत निर्माण करतां आला. याच कारणास्तव वर उद्धृत केलेल्या उताऱ्यांत चरित्र-लेखनासंबंधीं जे विचार लेखकानें प्रगट केले आहेत त्याला प्रस्तुत चरित्राचे लेखक हे अपवाद होत यावद्दल प्रश्नच उरत नाहीं. इतकेंच नव्हे तर अशा श्रीएकनाथमहाराजांसारख्या थोर संतविभूतींचीं चरित्रें नेहमीं अधिकारसंपन्न अशाच एखाद्या लेखकाकडून लिहिलीं जातात, हें ध्यानांत धरण्यासारखें आहे (तुका म्हणे येथें पाहिजे जातीचें । येरा गबाळाचें काम नाहीं ॥ ).

प्रकाशकांनीं प्रस्तुतच्या चरित्राला मी उपोद्घात लिहावा अशी आपली इच्छा प्रदर्शित केली. उपोद्घात या शब्दाची व्याख्या श्रीरंगनाथस्वामींनीं श्रीचिन्मदानंदलहरींत दिली आहे, ती अशी:—

"प्रतिपाद्यमर्थं बुद्धौ संगृह्य तदर्थमर्थांतरवर्णनमुपोद्घातः ॥'

'तरी प्रतिपाद्य जो मुख्य अर्थ असे । तो बुद्धीमाजी धरूनियां विशेषें ।

त्याकारणें अर्थांतरानुवाद करिजेत असे। 'उपोद्घात' ऐसें त्यातें म्हणती ॥ तरी मुख्य अर्जुनासी ज्ञानोपदेश। मोहनिरस्यर्थ करी हृषीकेश। त्यानिमित्त कथांतराचा उपदेश। ह्याची सावकाश 'उपोद्घात' ॥ "

'प्रतिष्ठान–चरित्रां'त ग्रंथाच्या अधिकारी लेखकानें श्रीएकनाथमहाराजांच्या श्रीगुरुदेवभक्तीचें रहस्य वाचकांच्या निदर्शनाला आणून देण्याच्याच मुख्य हेतूनें हा ग्रंथ तयार केला असला पाहिजे, आणि हें समग्र ग्रंथाचें परिशीलन केल्यानें कोणत्याही वाचकाच्या सहज लक्षांत येण्यासारखें आहे. तरी ग्रंथकर्त्याचा हा मूळ हेतु लक्षांत घेऊन त्या हेतूला परिपोषक अशींच वचनें श्रीएकनाथमहाराजांच्याच कृपेनें शोधून काढून त्यांचें येथें विवरण करण्यांत येणार आहे.

श्रीएकनाथमहाराज हे परम गुरुभक्त असल्यानें त्यांची सेवा एकनिष्ठपणें होत असे आणि हें प्रस्तुतचें चरित्र समग्र वाचल्यानें सहज कळून येण्यासारखें आहे. ही सेवा किती उच्च दर्जाची होती––किती निकृष्ट कामामधून सुद्धां व्यक्त होई, हे त्यांच्याच पुढील शब्दांत सांगतां येईलः––

"तहान विसरली जीवन। क्षुधा विसरली मिष्टान्न।
करितां गुरुचरणसंवाहन। निद्रा जाण विसरला॥
गुरुसेवेसी गुंतलें मन। विसरला स्त्रीपुत्रधन।
विसरला मनाची आठवण। मी कोण हें स्फुरेना॥";

" सेवेची आवडी। विराम नाहीं अर्ध घडी ॥ १ ॥
नित्य करितां गुरुसेवा। प्रेम घडीभर होत जीवा ॥ २ ॥
आळस येवोंचि सरला। आशाशुकेचा ठावो गेला ॥ ३ ॥
तहान विसरली जीवन। भूक विसरली मिष्टान्न ॥ ४ ॥
आंभईसी वाव पुरता। सवड नाहींच तत्वतां ॥ ५ ॥
ऐसें सेवे गुंतलें मन। एका जनार्दनीं शरण ॥ ६ ॥"

त्याचप्रमाणें श्रीनाथांनीं सद्गुरूंच्या हलालखोरीचें कामसुद्धां प्रसंगीं कसें केलें याचेंही वर्णन या चरित्रांत श्रीकृष्णदास जगदानंद–नंदनांनीं दिलें आहे तें वाचलें म्हणजे गुरुभक्तीची परमसीमा श्रीनाथांनीं कशी गांठली, याची कल्पना येऊन मन विस्मित झाल्यावांचून रहात नाहीं!

या विद्यमान श्रीनाथचरित्रातील कांहीं घटना वस्तुस्थितीस सोडून कशा प्रचलित झाल्या आहेत, याचें थोडेसें दिग्दर्शन प्रस्तावनेत करण्यांत आलें आहेच. तथापि त्यांतल्या त्यांत महात्त्वाच्या आजाआजींना सोडून श्रीनाथ श्रीजनार्दनस्वामी कडे पळून गेले ही समजूत कशी सर्वस्वी निराधार आहे, हें थोड्या तपशीलानें येथें सांगावेंसें वाटतें. यासंबंधीं वर्णन करताना श्रीकृष्णदास जगदानंद-नंदन म्हणतात:–

" मग पाचारूनी येकनाथ । चक्रपाणी जाला सांगत । म्हणे आमुच्या वंशात । तू येकलें येकला ॥२५॥ म्हणे आमुचे भरले पूर्ण दिवस । आम्हां जाणें निजधामास । आतां तुझ्या संरक्षणास । तुज कोण्हास निरवावें ॥२६॥ तरी आहे येक विचार । अमरावती* नाम नगर । जेथें जनार्दन साधू थोर । अति उदार सुखदाता ॥२७॥ श्रीदत्तात्रेय आदिपुरुष । तोचि चंद्रशेखर प्रत्यक्ष । त्या चंद्रशेखराचा नि:शेष । पूर्ण शिष्य जनार्दन ॥ २८ ॥ ××× जनार्दना शरण जामी । सर्व सुखाचं सार लाधसी । हें सत्य मानलें आम्हांसी । निश्चयेंसी निर्धार ॥ ३२ ॥ "

वास्तविक "वडिलांची आज्ञा घेतल्यावांचोनी । कोठें घरांतुनी जाऊं नये ॥" असें जें सुबोधवचन जुन्या मराठी क्रमिक पुस्तकात सांपडतें, तें परंपरागत आलेल्या या शिस्तीला धरूनच आहे. आमच्या परपरेंत हा नियम अगदीं कडक रीतीनें पाळला जातो वडिलांच्या हयातींत त्यांची आज्ञा घेतल्याशिवाय व आतां त्यांच्या पश्चात् चित्याचे द्वारा अर्थात् कौल्द्वारा त्यांची आज्ञा मिळाल्याशिवाय कोणतीही महत्त्वाची गोष्ट करण्यांत येत नाहीं आमच्या सद्गुरु-मंदिरांतही मुलींमुलींनीं आपल्या वडिलांच्या अगर पालकांच्या व स्त्रियांनीं आपल्या पतींच्या आज्ञेशिवाय यावयाचें नाहीं असा दंडक आहे अनुग्रहाच्या बाबतींत तर हा नियम फार कडक रीतीनें पाळला जातो श्रीजनार्दनस्वामींची शिस्त याचप्रमाणें या बाबतींत फार कडक होती आणि हें प्रस्तुतच्या चरित्रांतील पुढील हकीगतीवरून स्पष्ट होत आहे–

प्रथम भेटींत ( द्वितीयाध्यायाच्या २६ व २७ या दोन ओव्यांत ) श्रीजनार्दनस्वामींनीं श्रीएकनाथमहाराजांच्या मुखानें त्यांच्या वडिलांची सर्व हकीगत

* हल्लींचें अहमदनगर .

ऐकल्यावर ३० ते ३७ ओंव्यांत त्यांना धिक्कारयुक्त वाणीने संबोधून ते म्हणाले:—

" हें ऐकोनि जनार्दन । येकनाथासी धिक्कारी पूर्ण । सांडोनी वृद्ध दोघे-जण । येथ शरण आलासी ॥३०॥ तुझ्या वियोगें जाण । तात्काळ सांडिती प्राण । जळों जळों तुझें ज्ञान । केवळ अज्ञान जालासी ॥३१॥ रडतील पडतील क्षितीं । भलत्यास येतील काकुलती । काय भ्रंशली तुझी मती । जाई निश्चितीं माघारा ॥३२॥ सांडूनि वृद्धांचें भजन । हृदय केलें परम कठिण । येथें आलसी शरण । तुज मी ज्ञान सांगेन ॥३३॥ जरी तुज पाहिजे गुह्य ज्ञान । चक्रपाणि सांगेल आपण । तो केवळ ज्ञानघन । ब्रह्मसंपन्न महासाधू ॥३४॥ पितानें प्रसन्न केला भानू । म्हणोनि पुत्र स्वप्रकाश भानू । आणि ब्रह्मज्ञानाचा निधानू । नेणसी महिमानू तयाचा ॥३५॥ अलक्षून वडिलांसी । शरण म्हणूनी आलासी । तुज उपदेश करावयासी । पाहिजे आम्हांसी त्याची आज्ञा ॥३६॥ कठिण हृदयीं गुह्य ठेवणें । हेंची आम्हां लाजिरवाणें । संत हासतील संपूर्ण । कानीं वचन ऐकता ॥३७॥ "

श्रीएकनाथमहाराजांनीं वरील सर्व भाषण शांतपणे ऐकून घेऊन श्रीजनार्दन-स्वामींचे चरण दृढ धरिले व अति लीनतनें आपण वडिलांच्या अनुज्ञेनेंच कसा आलों ती हकीगत ४१ ते ४३ *या ओंव्यांत पुढीलप्रमाणे थोडक्यांत निवेदन केली:—*

" ऐकोनि जनार्दनाचें वचन । येका घाली लोटांगण । म्हणे श्रीगुरु तुमची आण । नाही अवगणना त्या केली ॥४१॥ नाहीं उलंघिलें वृद्धांचें वचन । नाहीं आलों पलायमान । संतोषें आज्ञा घेऊन । आलों जाण स्वामिया ॥४२॥ मस्तकीं वंदून त्यांची आज्ञा । मी आलोंजी परमसुज्ञा । वडिलांची अवज्ञा । नाहीं सर्वज्ञा त्या केली ॥४३॥"

वर उद्धृत केलेल्या ३४ ते ३७ या ४ ओंव्यांत जे विचार श्रीजनार्दनस्वामींनीं प्रगट केले आहेत, त्यांवरून श्रीनाथांचे आजे श्रीचक्रपाणि हे ब्रह्मसंपन्न असूनही त्यांची उपेक्षा करून ( अलक्षून वडिलांसी । शरण म्हणूनी आलासी । ) एकनाथ आपल्याला शरण आलेले त्यांना मुळींच पसंत झालें नाहीं आणि म्हणून त्यांनीं वरील ३४ व्या ओंवींत " जरी तुज पाहिजे गुह्य ज्ञान । चक्रपाणि सांगेल आपण । तो केवळ ज्ञानघन । ब्रह्मसंपन्न महासाधू ॥ " असे स्पष्टोद्गार काढून

श्रीनाथास परत जावयास सांगितलें ( काय भशली तुझी मती । जाईं निश्चितीं माघारा॥ ३२ ॥) श्रीजनार्दनस्वामींचा या बाबतींत एवढा कटाक्ष होता याचें कारण अन्यसंप्रदायातील माणसें आपल्या संप्रदायात वळवून घेणें हें महत्पाप असून तसें करणाऱ्याची ज्ञानहानी होत असते, असा सतसंप्रदायाचा दंडक आहे आणि तो पौराणिककालात अवतारीक पुरुषांच्या चरित्रातही पाळलेला दिसून येतो

विश्वामित्रांकडून श्रीरामचंद्रांना उपदेश मिळावा अशी इच्छा वसिष्ठांना प्रद र्शित केली असता विश्वामित्रांनीं त्याना श्रीभावार्थरामायणात पुढील उत्तर दिलें —

" तुज ऐसा कुळगुरु असता । मी उपदेशूं नये रघुनाथा । तरी वसिष्ठासी अनन्यता । ज्ञानप्राप्त्यर्थ शरण रिघें ॥ पुढीलाचा शिष्य अति वरिष्ठ । त्यासी चाळवी तो गुरुभ्रष्ट । उपदेशी तो ज्ञाननष्ट । अति पापिष्ट महाभ्रमें ॥ वसिष्ठ ज्ञानगुरु सूर्यवंशीं । त्याच्या शिष्यासी जो उपदेशी । तेणें जोडिल्या पापराशी । गुरुत्वें शिष्यासी उपदेशिता ॥ परशिष्यासी उपदेशन । तें गुरुत्वासी अति दूषण । अशिष्यासी सांगावें ज्ञान । तें निंद्य पूर्ण सर्वार्थी ॥ '

आणि याच कारणास्तव श्रीशिवछत्रपति हे श्रीतुकाराममहाराजाना शरण आले असता, महाराजांनीं त्याना पुढील अभंगद्वारा बोधामृत पाजून त्याचे मन वळविलें व त्याना—

" सद्‌गुरू श्रीरामदास साचें भूषण । तेथें घालीं मन चळों नको ॥
बहुता ठायीं वृत्ति चावळली जेव्हा । रामदास्य तेव्हा घडे कैसें ॥ "

अशा प्रकारचा हितोपदेश करुन श्रीसमर्थांकडेच परत लावून दिलें —

" राया छत्रपती ऐकावें वचन । रामदासीं ध्यान लावा वेगीं ॥
धरू नको आस आमुची भूपाळा । रामदासीं डोळा लावा वेगीं ॥
शरण असावें रामदासालागीं । नमन साष्टांगीं घालीं त्यासी ॥
तुका म्हणे राया सुखी असो कल्याण । सद्‌गुरु शरण असें बापा ॥ "

श्रीएकनाथमहाराजांचें हें 'आत्मज्ञान-चरित्र' अपूर्व झालें आहे, असें त्यांच्या वांचून माझ्यानें राहवत नाहीं 'शिपप्रमादग्रहणीं । लोभ अपार असावा ॥ ' * य

* या शीर्षकाखालीं ' सद्धर्म प्रकाश ' मासिकाच्या ( ट्रिनिंग पब्लिसिंग सोसायटी, जोगेश्वरी, मुंबई, वार्षिक वर्गणी रु ३-३-० ) चालू असत असिद्ध झालेल्या लेखात प्रस्तुतच्या विषयाचा नामनाच परामर्श घेतला गेला आहे

श्रीनारदोक्तींत वर्णन केलेल्या मोक्षाची महाराजांच्या आचरणांत पराकाष्ठा झाल्याचें पुढील ओंव्यावरून स्पष्ट दिसून येत आहे:—

"भीड सांडोनि सकलिका। गुरु उच्छिष्ट चाटि येका। द्विजांसि टक पडिलें देखा। जालें सकळिका चोज ॥५२॥ उच्छिष्टासहीत पत्रावळी। चाटुनी गुरुप्रसाद गिळी। स्त्रिया बोलती तयेवेळीं। याणीं प्रातःकाळीं नवल केलें ॥५३॥'

संत हे कोणतीही गोष्ट आधाराशिवाय करीत नसतात व सांगतही नसतात. शेषप्रसादग्रहणाच्या बाबतींत श्रीनाथमहाराजांनीं महामुनि श्रीनारदाचेंच अनुकरण केलें असावें असें वाटतें. याचें कारण श्रीनाथमहाराजांचें इतर पुराणाप्रमाणें श्रीमद्भागवत–पुराणाचेंही उत्तम परिशीलन झालें होतें; आणि हें श्रीभागवतातील स्कंद १-५ मध्यें आलेल्या मुनिवर्यांच्या पावन चरित्रांतील पुढील उताऱ्यावरून स्पष्ट होत आहे :—

"नारदाची त्याच्या मातोश्रीनें बालवयापासून वेदज्ञ ऋषींच्या सेवेकडे योजना केली होती. ऋषींच्या शुश्रूषेंत असतांना आपण कसा राहिलों हें प्रथम सांगून आपल्यावर त्यांची कृपा उच्छिष्ट-सेवनानें कशी झाली, हें नारद स्वमुखानें सांगतात:—

' उच्छिष्टलेपाननुमोदितो द्विजैः सकृत्स्म भुंजे तदपास्त किल्बिषः ।
एवं प्रवृत्तस्य विशुद्धचेतसस्तद्धर्म एवा ऽऽत्मरुचीः प्रजायते ॥ '

भावार्थ'— त्या ब्राह्मणांच्या पानांतील उच्छिष्ट अन्न ते सांगतील व देतील तेव्हांच एकदां आपण खात असें, तेणेंकरून ( त्या पवित्र अन्नाच्या सेवनानें ) आपलीं सकल पातकें नष्ट झालीं व अशाप्रकारें क्रम चालला असतां आपली चित्तशुद्धि झाली व त्या महात्म्यांच्या धर्माविषयीं ( अर्थात् कर्मरूप व ज्ञानरूप भागवतधर्माविषयीं ) आपल्याला आवड उत्पन्न झाली. "

ह. भ. प. साधुदास यानीं चमत्कारांसंबंधीं प्रस्तावनेंत काढलेले- "चरित्रकाराचा उघड उघड हेतु श्रीनाथाच्या अद्भुत चमत्कारांनीं भाविकांना चकित करण्यापेक्षां श्रीनाथांची नित्याची दिनचर्या त्यांच्यापुढें मांडून श्रीनाथ कशी तपश्चर्या करून आपल्या जगन्मान्य पदवीस चढले ... त्याचें असल्याग

कांहीं सुप्रसिद्ध घटना प्रस्तुत चरित्रकारानें वगळल्या आहेत" हे उद्गार यथायोग्यच आहेत, यांत संशय नाहीं खरें सत हे चमत्काराना कधींही महत्त्व देत नाहींत चमत्कारासंबधीं * स्वत श्रीसमर्थ—**"आम्हीं तों नेणों चमत्कार । सर्वस्व आमुचा श्रीरघुवीर ॥"** असेंच म्हणतात. **"ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या"** असा सर्व संताच्या बुद्धीचा ठाम निश्चय झालेला असून ते सदा श्रीकृष्णांनीं अर्जुनाला केलेल्या—"अर्जुना तूं जाण रे । होशील सुजाण रे । विश्व नाहीं मीच आहें । सखया तुझी आण रे ॥" व "विश्व नव्हे हें अर्जुना। येथें पदार्थ काहींच असेना । माझ्या युक्तीची रचना । इतुकेंचि पाहें ॥"(वा प) या दिव्य बोधामृताचें पान करीत असतात हें जरी खरें आहे तरी ते चमत्कार होतच नाहींत किंवा ते होणें शक्यच नाहा असं मात्र कधींही म्हणणार नाहींत जग हें केवळ मायामय विभ्रम असून '**मा**' म्हणजे नव्हे आणि '**या**' म्हणजे नसोनि भासे असा या '**माया**' शब्दाचा विग्रह असल्यामुळें 'जग हें नसोनि भासे' असाच येथें सिद्धांत ठरतो. याच न्यायानें 'चमत्कार हा नसोनि भासे' हेंही त्याबरोबरच ओघानें ठरतें आणि याच कारणास्तव प्रस्तुतच्या ग्रंथकारानें आपल्या ग्रंथांत चमत्काराचा विस्तार केला नाहीं हें ठीकच झालें, हे कोणीही कबूल करील

वास्तविक, एखाद्या मेलेल्या घारीला उठवणें अगर मृत मनुष्याला जिवंत करणें ह्यापेक्षा जन्मोजन्मीं मृत्युमुखीं पडणाऱ्या जीवाला अमरत्व देऊन अचलपदी बैसविणें हा केवढातरी मोठा चमत्कार आहे. यापुढें वरील क्षुद्र चमत्कार म्हणजे सूर्यापुढं केवळ काजवेच होत

प्रस्तुत ग्रंथात अशुद्धें बहुत असल्याची तक्रार येण्याचा बराच संभव आहे. परंतु, याचा विचार असा आहे कीं, शब्द हीं केवळ शरीरं असून अर्थ हा त्यांचा आत्मा होय (वेदाचा तो अर्थ आम्हासीच ठावा । इतरांनीं वहावा **भार माथा ॥**—तुकाराममहाराज). शरीरें हीं शीर्ण होणारीं अर्थात् नाश

---

* चमत्कारासंबधींचा सविस्तर खुलासा—"श्रीगीताध्याय-सारामृत" (प्रकाशक—ट्रिनिटी. पब्लिसिटी. मोगरापाडी–जोगेश्वरी., मुंबई, किंमत.दोन.रुपये), या ग्रंथात पृ ४६ ते ५१ मध्यें झाला आहे

पावणारीं असून त्यातील आत्मा हाच अविनाशी आहे यासरितां सद्बुद्धीला शब्द सोडून अर्थाकडेच डोळे देणे हें केव्हाही इष्ट होईल—केव्हाही कल्याणाचें होईल

"विद्याचि भूषण नरा व्यर्थ अलंकार रत्न-हेमाचे" हे जितकें विद्येच्या बाबतींत सत्य आहे व शरीराच्या सौंदर्यानें शरीर हेंच अलंकारास भूषण होत हें जितकें शरीराच्या बाबतींत सत्य आहे, तितकेंच अर्थ हा शब्दाना विभूषित करणारा आहे हे अर्थाच्या बाबतींत सत्य आहे श्रीज्ञानेश्वरमहाराजाच्या पुढील ओवीत आपल्याला याच रहस्य सापडतें —

" जैसें अंगाचेनि सुंदरपणें । लेणियासी आगळें होय लेणें ।
तेथ अलंकारिलें कवण कवणें । हें निर्वचेना ॥ "

यासरिता अर्थपूर्ण अलंकाराना विभूषित झालेल्या शब्दप्रयोगाची—शब्दरचनाची गोडी 'दुधात साखर ' या न्यायानें तत्त्वदर्शी विद्वज्जनाना चाखावयास मिळेल यात सशय नाहीं परंतु, अर्थाकडे लक्ष नसून अगर अनुभवाशिवाय केलेली शब्दरचना ही केव्हाही फोल ठरेल म्हणूनच शब्दालंकारातच रममाण पावणाऱ्या वाक्पंडिताना अर्थावबोधापासून निर्माण होणारी गोडी कशी बरं चाखावयास मिळेल ? ग्रंथ कितीही सुंदर शब्दप्रयोगानीं खचून भरलेला असला तरी तो तात्त्विकदृष्ट्या चांगलाच ठरेल असें नाहीं "जें जें चकाके तें सोनें नसे" (All that glitters is not gold) या म्हणीप्रमाणें शब्दाचा सुंदर पोषाख पेहराविलेले विचार नहमींच सुविचार ठरतील असे नाहीं एखादा मनुष्य ऐटबाज भपकेदार पोषाख घालून मिरवू लागला, म्हणून तो कांहीं सद्गृहस्थ होऊ शकत नाहीं उलटपक्षीं आजकाल तर अशाच पोषाखात मिरविणाऱ्या सभावित सोद्याकडूनच चोऱ्यामाऱ्या होत असल्याचे बहुत कटु अनुभव येत असतात असे अनुभव आताच येतात अशातला प्रकार मुळींच नाहीं फार पुरातन काळापासून लोक हे अनुभव घेत आले आहेत. श्रीमद्भागवतकार काय म्हणतात तें पहा —

"'असभ्या सभ्यसंकाशा सभ्याश्चासभ्य दर्शना ।
दृश्यन्ते विविधाभावास्तेषु युक्त परीक्षणम् ॥'

*'पुष्कळ असभ्य मनुष्य सभ्य असल्याचीं दिसत[illegible] [illegible] प्रकारच्या मह[illegible]*

दिसतात, पण त्या तशा असतातच असें नाहीं. यास्तव त्यांची नीट परीक्षा करणें युक्त आहे.' "

यकीतां—"काय करावा चांगला। नाहीं अंतरीं रंगला ॥" ही श्रीतुकाराममहाराजांची उक्ति किती अलौकिक आहे बरें !

श्रीकाशींतील सर्व महापंडितांना वादांत हात टेकावयास लावून आजिंक्य पत्रें मिळविलेले श्रीवामनपंडित विद्वत्तेसंबंधीं—पांडित्यासंबंधीं यथार्थदीपिकेंत काय म्हणतात पहा:—

"मुख्य तुझें नाम गोड। पुरवी सर्वां मायांचें कोड। तें कानीं सुखीं येतां मोड। देहीं उपजती प्रेमाचे ॥ काय वेदशास्त्र जाणे व्रज। ज्यांची भक्ति देखोनि तुझा आरभज। ब्रह्मा वेदवक्ता शिरीं पदरज। वंदी व्रजनारीनरांचे ॥ गजेंद्र कोण शास्त्र पढला। बाळ कोण्या पांडित्यें ध्रुवपदा चढला। दासी कुब्जा तिला घडला। काय अभ्यास संस्कृताचा ॥ व्रजीं चारितां गायी। कुचकुंकुमें गोपिकांचीं पायीं। तदंकित तुझें कृतार्थ ठायीं ठायीं। दळव त्रिपद पटळिया त्या काय ॥ अभिमानें बुडाले पंडित। भक्तजन्यांनीं अर्चिलें वैकुंठ मंडित। न पढतां न वाचितां अखंडित। आनंद भक्तांनीं पावल्या ॥ भक्ति थोर भक्ति थोर। तूं चंद्रमा भक्त तुझे चकोर। तूं मेघ भक्त मयूर। मेघश्याम समोर त्यांस तूं सर्वग्रही ॥ एवं पावावया तुझे चरण। भाषा कोणी नव्हे कारण। कारण सप्रेम अंतःकरण। देवाधिदेवा ! ॥"

अर्थात् श्रीस्वामी विवेकानंद यांनी तत्त्वज्ञान व बुद्धिमत्ता यांची तुलना करतांना बुद्धिमत्तेबद्दल जो शेरा मारला आहे, तो विचार करण्यासारखा आहे. कारण, स्वामीजी हे बी. ए. होते, एवढेंच नाहीं तर ते विद्वत्ताप्रचुर असून कुशाग्र बुद्धीचे होते व त्यांनीं आपल्या व्याख्यानांनीं अमेरिकेंतील थोर विद्वानांशीं चकित करून सोडलें होतें, हें सर्वश्रुतच आहे. स्वामींनीं काढलेले पुढील अमोलिक उद्गार वरील विषयावर उत्तम प्रकाश पाडतात —

"जन्मभर आध्यात्मिक व तत्त्वज्ञानाच्या ग्रंथांचा जरीं अभ्यास केला तर बुद्धीचा विकास होईल, परंतु आत्मनिरीक्षण केलें असतां अध्यात्मा या बाजूनें मुळींच प्रगति झाली नाहीं, असें शेवटीं दिसून येईल. ज्या मानानें बुद्धीचा विकास होतो त्याच मानानें मनुष्याची अध्यात्ममार्गीं उन्नति होते, असें मानणें चुकीचें आहे. उलटपक्षीं आपण बहुतकरून असें पाहतो कीं, बुद्धीचा विकास झाला म्हणजे अध्यात्मबाजू लंगडी पडते. बुद्धीचा विकास करण्यास पुस्तकांची पुष्कळ मदत होते, परंतु आध्यात्मिक उन्नतीला त्याचा बहुतेक कांहींच उपयोग होत नाहीं."

इतकेंच नव्हे ! आपले चरित्रनायक श्रीएकनाथमहाराज यांनीं श्रीभागवतांत संस्कृत * व प्राकृत या भाषांसंबंधीं बोलतांना जे पुढील विचार प्रगट केले आहेत, ते या सिद्धांताला चांगलीच पुष्टि देणारे आहेत —

"देशभाषावैभवें । प्रपंचपदार्थीं पालटलीं नांवें । परी रामकृष्णादि नामां नव्हे । भाषावैभवें पालट ॥ संस्कृत वाणी देवें केली । प्राकृत तरी चोरापासोनि जाली । असोतु या अभिमानभुली । वृथा बोलीं काय काज ॥ आतां संस्कृता किंवा प्राकृता । भाषा जाली जे हरिकथा । ते पावनचि तत्त्वतां । सत्य सर्वथा मानली ॥"

जातां जातां श्रीएकनाथमहाराजांच्या एका अभिनव संशोधनाचें येथें स्पष्टीकरण करावेंसें वाटतें. हें संशोधन म्हटलें म्हणजे 'श्रीकृष्णाचे सद्गुरु श्रीदुर्वास !'

---

* पाहिलें नसतां संस्कृतीं । रीघ नाहीं महाराष्ट्र–ग्रंथीं । हृदयीं वसल्या कृपामूर्ति । सद्गुरुस्वामी ॥ आतां नलगे संस्कृत । अथवा ग्रंथ प्राकृत । माझा स्वामी कृपेसहित । हृदयीं वसे ॥ न करितां वेदाभ्यास । अथवा श्रवणसायास । प्रयत्नेंवीण सौरस । सद्गुरुकृपा ॥ (दासबोध)

हे होय. संताच्या दरबारात आजपर्यंत प्रचलित असलेल्या समजुतीला जबरदस्त धक्का देण्यासारखा हा नवीन शोध प्रकाशात निर्भीडपणें आणून श्रीनाथमहाराजांनीं जगतावर अनंत उपकार केले आहेत, यांत संशय नाहीं. या वादविवादात्मक विषयाचा येथें, थोडक्यात का होईना, खुलासा होणें अत्यंत जरूरीचें आहे. कारण, प्रस्तुत ग्रंथकारांनीं श्रीएकनाथमहाराजांच्या गुरुभक्तीचें वर्णन दुसऱ्या अध्यायांत करीत असतां ओघानेंच श्रीकृष्ण हे पूर्णब्रह्म असूनही त्यांनीं श्रीसांदीपनाच्या आश्रमांतील मुक्कामांत गुरूची निकृष्ट सेवा केल्याचा उल्लेख—" गुरुभक्ति-लागीं श्रीहरी। काष्टभारे वाहे शिरीं। सांदीपनाचे घरीं। हें चराचरीं जाणिजे ॥ ८१ ॥" ह्या ओंवींत केला आहे. ग्रंथकारांनीं ही हकीगत रूढ असलेल्या समजुतीला धरून लिहिली आहे आणि ती यथायोग्यच आहे. ग्रंथकाराच्या अवलोकनांत श्रीनाथांचा 'आनंदलहरी' हा छोटा पण गुरुभक्तिरसपरिप्लुत ग्रंथ आला नसावा असें ह्यावरून स्पष्ट होतें.

प्रचलित समजूत अगदीं वेगळी असतानाही श्रीनाथांना आपल्या 'आनंदलहरींत—" पूर्णब्रह्म श्रीकृष्णनाथ। तोही म्हणवी गुरुभक्त। दुर्वास याची सेवा करीत। नित्यमुक्त याचेनीं ॥ ब्रह्मपदाचा अधिकारी। म्हणवूनि विश्वातें उद्धरी। स्मरणमात्रें दुरितें हरी। तो श्रीहरी गुरुभक्त ॥' याप्रमाण 'श्रीकृष्णाचे मोक्षगुरु श्रीदुर्वास' हा शोध जगतापुढें मोठ्या धैर्यानें मांडतां आला याचें कारण त्यांनीं अठराही पुराणांचें चांगलेंच परिशीलन केलें होतें आणि हें ग्रंथकार पाचव्या अध्यायाच्या पुढील ओंवींत स्पष्ट सांगत आहेत —

" ऐसीं हे अष्टादश पुराणें। येका श्रवणार्थीसीं सावधान।
जव होय अस्तमान। तंव नित्य नूतन संपादिती ॥९१॥ "

श्रीएकनाथमहाराजांना त्या काळीं आपला अभिनव शोध साधार व सप्रमाण रीतीनें सिद्ध करून दाखविण्याची आवश्यकता वाटली नसावी. परंतु, वाचकांची ही जिज्ञासा तृप्त व्हावी या हेतूनेंच या महत्त्वाच्या संशोधनाच्या पुष्ट्यर्थ कांहीं आधार पुढें देण्यांत येत आहेत —

श्रीकृष्णांनीं अगदीं बालवयांत अर्थात् गोकुळांत असतांना गोपिकांना रासक्रीडा प्रसंगीं दिव्यज्ञान देऊन नंतर ते मथुरेस गेले. तेथें कंसवधानंतर कुलगुरु श्रीगर्गाचार्य

यांचेकडून त्यांचा मौजीबंधन-संस्कार झाला व ते बंधु बळरामासह श्रीसांदीपनींच्या आश्रमात विद्याभ्यास करण्यास गेले, असें इतिहास सांगतो. मौजीबंधनानंतर गुरुगृहीं शास्त्राभ्यास करण्यास जाणें, हे शास्त्राला व त्यावेळच्या जनरूढीला धरनच होतें व ह्या रूढीला अनुसरूनच प्रख्यात गुर्जर संतकवि श्रीनरसी मेहता यांनी आपल्या 'सुदाम–चरित्र' ह्या काव्यांत श्रीसांदीपनींना 'गोर' ( पुरोहित=वेदाध्ययन करविणारे ) गुरु ह्या संज्ञेनें उल्लेखिलें आहे. परंतु, पूर्ववयांत गोपींना आत्मज्ञान देऊन त्यानंतर स्वतः आत्मज्ञान मिळविण्याकरितां श्रीसांदीपनींकडे जाणें हा विपरीत क्रम कोणाही समजस मनुष्याला पटणार नाहीं.

श्रीगीतोपदेश करणाऱ्या श्रीकृष्णानीं आपण स्वतः पूर्णावतार असूनहीं श्रीगीतेंतील उपपादिलेलीं तत्त्वें स्वतः आचरणांत कशीं आणून दाखविलीं, हे ब्रह्मपुराणांतील ( हें पुराण सर्व पुराणांत प्राचीन आहे, असें श्रीविष्णुपुराणावरून सिद्ध होतें ) श्रीकृष्ण निजधामाला गेले त्यावेळच्या खालील वर्णनावरून अति स्पष्ट होत आहे :—

" ' स मानयन्द्विजवचो दुर्वासा यदुवाच ह ।
योगयुक्तोऽभवत्पादं कृत्वा जानुनि सत्तमः ॥ '

'स्वतः भगवान् म्हणजे 'कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुम्' याप्रमाणें सामर्थ्य असणारा श्रीकृष्णही लोकयात्रेला अनुसरून द्विजाग्रणी असा जो सद्गुरु श्रीदुर्वास त्याच्या सांगण्याप्रमाणें सर्व चित्तवृत्तींचा निरोध करून केवळ परब्रह्माचेंच ध्यान करीत अवतारसमाप्तीचा क्षण केव्हा येतो, याची वाट पहात होता ' "

हें विज्ञान अर्थात् विशिष्ट किंवा अन्वयज्ञान म्हणजेच पूर्ण अनुभवजन्य ज्ञान श्रीकृष्णाना श्रीदुर्वासमहर्षींकडून प्राप्त झालें याचा उल्लेख युधिष्ठिरानीं अनुशासनपर्व अध्याय १६१ मध्ये पुढील श्लोकांत स्पष्टपणें केला आहे, तो असा :—

" दुर्वाससः प्रसादात्ते यत्तदा मधुसूदन ।
अवाप्तमिह विज्ञानं तन्मे व्याख्यातुमर्हसि ॥ १ ॥
महाभाग्यं च यत्तस्य नामानि च महात्मन ।
तत्त्वतो ज्ञातुमिच्छामि सर्वं मतिमतांवर ॥ २ ॥ "

शिवाय विष्णूचे गुरु शंकर व शंकराचे गुरु विष्णु ( श्रीविष्णोः गुरुः

शम्भुः । श्रीशम्भोश्च गुरुः श्रीविष्णुः ॥ ) ही जी अनादिकालापासून सारखी परंपरा चालू आहे, तिला अपवाद होणे शक्यच नाही. तस्मात् श्रीसांदीपनि हे शिवावतार नसल्यामुळे ते 'श्रीकृष्णाचे मोक्षगुरु होऊं शकत नाहीत. इतके विवेचन करण्याचीही आतां वास्तविक आवश्यकता उरली नाही. हातच्या कांकणाला आरसा कशाला पाहिजे? श्रीकृष्णांचे जातक-नामकरण वगैरे संस्कार केलेले कुलगुरु श्रीगर्गाचार्य यांच्या संहितेंत श्रीकृष्ण स्वत:च हे कोडें उलगडून सांगत आहेत. येथे श्रीकृष्ण गोपींना आपण उशिरां आल्याचें कारण सांगतांना म्हणतात :—

" भाण्डीरे मे गुरुः साक्षात् दुर्वासा भगवान्मुनिः ।
आगतोऽद्य प्रियास्तस्य सेवार्थं गतवानहम् ॥ "

श्रीकृष्णांनीं स्वतःच असंदिग्धपणें 'माझे सद्गुरु श्रीदुर्वास'ऋषि असें येथे सांगितल्यावर श्रीनाथांच्या 'आनंदलहरीं'तील वचनाबद्दल आतां शंका घेणंच शक्य नाही.

प्रस्तुत ग्रंथकारांनीं पूर्वापार समजुतीला अनुसरून श्रीकृष्णांच्या पराविद्येच्य गुरुत्वाचा मान जरी वर निवेदिल्याप्रमाणें श्रीसांदीपनींना दिला आहे तरी श्रीदुर्वासमहर्षींबद्दल त्यांना किती आदर होता, हें त्यांच्या पुढील उद्गारावरून स्पष्ट होत आहे :—

" ग्रासोग्रासी हरिस्मरण । तो जेविला निराहारी जाण ।
या स्मरणाचें महिमान । कळले जाण दुर्वासासी ॥ "

असो या 'प्रतिष्ठान-चरित्रा'चे कर्ते श्रीकृष्णदास जगदानंदनंदन यानीं अकराव्या अध्यायातील ओंव्यात या दिव्य ग्रंथाची फलश्रुति सांगतांना एकादश अंकाची महती गाइली आहे, ती अशी.—

" हे प्रतिष्ठान-चरित्र निरूपण । जो करी अनुष्ठान । त्यासी येका जनार्दन । सुप्रसन्न सर्वदा ॥ हें अकरा अध्याय निरूपण । भक्तियुक्त करितां श्रवण । अथवा करितां पठण । येकादशी महिमान तो लाभे ॥ येकनाथ साधी अकराचा आंख । त्या नांव येकादशी देख । येकादशी धरूनि करितां लेख । अकराचा आंख पडील पडे ॥ तो अकरावा आंख देखा । येकीं येकरेखें साधी येका । येकी येक मिळोनि देखा । महासुखा येका येकचीं मिळे ॥ "

ग्रंथकारांनीं येथें एकादशीचें महत्त्व एवढें वर्णिलें आहे, त्याचा आतां

विचार करू श्रीकृष्ण-भगवतांनींही मार्गशीर्ष शुद्ध एकादशीसच अर्जुनास बोध करण्याचा योग घडवून आणला. याचें कारण एकादशी या दिवशीं दहा इंद्रिय * व एक मन हीं ईश्वराकडे लावावयाचीं असल्यामुळें ही तिथी श्रीविठोबास प्रिय असून सर्व तिथींमध्यें ती श्रेष्ठ मानिली जाते एकादश पूजनाचं महत्त्व श्रीएकनाथमहाराजांनीं भागवतात वर्णिलं आहे, तें असें —

" अकरावे पूजेचा विवेक । मागा पुढा एक एक । अकरा इंद्रिया पडे आख । तोचि पूजक सर्व भूता ॥ मागा पुढा एक एक कीजे । त्या नाव एकादश म्हणिजे । हाचि विवेक जेणें जाणिजे । तेणें पूजिजे सर्व भूता ॥ "

श्रीएकनाथमहाराजांनीं अभंगरूपांत आपला अखेरचा जो दिव्य संदेश दिला आहे आणि जो प्रस्तुत ' प्रतिष्ठान-चरित्र 'चे आरंभी छापण्यांत आला आहे, त्याचेही महाराजांनीं अकराच चरण कल्पिले आहेत आणि हें देखील वरील विधानाला निःसंशय पुष्टि देणारें आहे.

फार कशाला, भगवद्गीतेच्या अठरा अध्यायांपैकी अकराव्यातच श्रीकृष्णांनीं अर्जुनास अपूर्व विश्वरूपदर्शन दिलें आहे व श्रीभागवताच्या बारा स्कंधांपैकीं अकराव्यातच उद्धवास ज्ञानोपदेश केला आहे याच कारणास्तव ' प्रतिष्ठान-चरित्र '-कार आपल्या ग्रंथाचे अकराच अध्याय कल्पून वर निवेदिल्याप्रमाणें अकराव्या अंकास एवढें महत्त्व देत आहेत

ह भ प माधुदास यांनीं श्रीगीताजयंती अर्थात् मार्गशीर्ष शु ११ ही तिथी आपली प्रस्तावना पुरी करण्यास जी ठरविली ती याच सदुद्देशानें असावी, अशी आमची भावना आहे आमचा हा 'उपोद्घात ही या एकादशीच्याच शुभदिनीं लिहून पुरा झाला तथापि आज श्रीदत्तजयंतीसारखा शुभदिन तो श्रीसद्गुरुचरणीं समर्पण करण्यास लाभत आहे हा त्यातल्या त्यात एक सुयोगच म्हणावयाचा

ह्या 'एकादशा'चें वर वर्णिलेलं महत्त्व लक्षात घेऊन ग्रंथकारमहाशय श्रीकृष्णदास जगदानंदनंदनांनीं प्रस्तुत ग्रंथाची फलश्रुति जी वर निवेदन केली

---

* दशेंद्रिया आणिक मानसासी । त्वदुपासकाच्या तू आवरीसी ॥
म्हणोनि एकादशी दर्शनाचा । महिमा तुझ्या वर्णिलि लोकवाचा ॥ —श्रीदत्तसुधा

आहे ती सूत्रप्राय अमून तिचा विषद अभिप्राय पुढीलप्रमाण सागता येईल —

या प्रतिष्ठान चरित्राच्या एकादशाध्यायाची एकादशीस दश इंद्रिय व एक मन एकत्र करून एकनिष्ठेनें सतत अकरा पारायणें केलीं असता पारायणें करणाऱ्या श्रद्धावताला ययावाळा नि सशय अधिष्ठानाची प्राप्ति झाल्यावाचून रहाणार नाहीं बहुभाग्यान ही प्राप्ति झाल्यावर याच चरित्राचीं श्रद्धायुक्त अत करणानें यथापूर्व पारायणें चालू ठेविलीं असता श्रीवामनपडितानी—

' अधिष्ठान सिद्धासनीं क्षिप्र सिद्धि जगद्रूप मी ब्रह्म ऐसी प्रसिद्धि ।
शरीरें फिरावें उठावें बसावें, परी नित्य यागासनीं त्या असावें ॥ "

या श्लोकात सागितल्याप्रमाणें अग गुरुभक्तिपरायण प्राप्तपुरुषाला—

"अपाणिपादो जवनो ग्रहीता पश्यत्यचक्षु स शृणोत्यकर्ण ।
स एव वेद्य न च तस्य वेत्ता तमाहुरग्र्य पुरुष पुराणम् ॥ "

या श्रुतींत वर्णिल्याप्रमाण अनादि वैकुठात पुराणपुरुष जो अंधिपायी नारायण त्याच्या दिव्य चरणकमलीं " गगेवौघमुदन्वति " या व

" यथा नद्य स्यदमाना समुद्रेऽस्त गच्छन्ति नामरूपे विहाय ।
तथा विद्वान्नामरूपाद्विमुक्त परात्पर पुरुषमुपैति दिव्यम् ॥ "

या अनुक्रमें श्रीभागवत व श्रुति यांच्या उपमानुरूप गगा सागर सगम–भक्तीचा परम दुर्लभ लाभ झाल्यागि वाय रहाणार नाहीं, अशी याची अलौकिक फलश्रुति आहे

प्रस्तुतच्या 'प्रतिष्ठान प्रथोदधीता' जेवढीं अमोलिक रत्न हातीं आगीं तवढीं या 'उपोद्घात'रूपी कोंदणात श्रीमद्गुरुकृपेन सुव्यवस्थितरीतीनें बसवून ह कारण आम्ही जगताच्या अवलोकनार्थ ठेवीत आहोंत आणखी खोल गेलों असतों तर याहून अधिक बहुमोल रत्न आमच्या हातीं आलीं असतीं, अशी आमची मनोदेवता आम्हाला स्पष्ट ग्वाही देत आहे परतु, स्थल कालाभावास्तव आम्हाला येथेंच थांबण क्रमप्राप्त झाल आह, त्याबद्दल वाईट वाटतें

शवटा, जसे श्रीनामदेव-तुकारामादि सतविभूतींचें उपास्य दैवत श्रीविठ्ठल, श्रीरामदासाचें श्रीराम, श्रीरमाकांतभद्रामाचें व श्रीवामनपडित चें श्रीकृष्ण तसें—

"सकळ देवाचें दैवत सद्गुरुराज एकला ॥ "

या सिद्धाताप्रमाण श्रीएकनाथमहाराजाच्या परपरेचें आद्यसद्गुरु व उपास्यदैवता श्रीगुरु

दत्तात्रेय हे असून आमच्याही परंपरेचे तेच मूळ सद्गुरु व अधिष्टित उपास्य देवता असल्यामुळे व त्याच्याच केवळ कृपाप्रसादें निर्माण झालेल्या या अलौकिक ग्रंथातील अति गहनभावावर उत्तम प्रकाश पाडण्यासही " तस्यैते कथिताह्यर्थाः प्रकाशंते महात्मनः ।" या श्रुतिवचनाप्रमाणें सर्वस्वीं तेच कारणीभूत असल्यामुळें व त्याच-प्रमाणें ही अल्पसेवा देखील त्याच्याच जयंतीमहोत्सवांत अनायासें घडून आल्यामुळें आजच्या त्याच्या या जयंतीदिनी त्याच्याच परमपावन दिव्य चरणीं पुढील श्लोकत्रय-द्वारा सर्वात्मभावें ती समर्पण* करून निलीन होतों —

" अर्पूं श्रीगुरुदत्तपाद–युगुलीं प्रेमें ' उपोद्घात ' हा ।
सा योनी गुरुपौर्णिमा तरि भली मार्सी विभूती महा ॥
झाला निर्मित जो हरिगुरुरूपें भक्तांसि सेवावया ।
भावें जे पठती मनेंकरुनियां साम्राज्य लाभे तयां ॥१॥

नार्थे पूर्णकृपाभरें जडजिवां श्रीकृष्णजींच्या करें ।
पाजोनी ' चरितामृता 'सि आपुल्या संतुष्ट केलें वरें ॥
तैसें घालुनि श्रेय वंशजकरीं केलें जगीं धन्य त्यां ।
लोकीं ते बहु धन्य वाचिति सदा 'चरिता प्रतिष्ठान' या ॥२॥

देवोनी पदिं मन्मना अजि गुरू दत्ताचिया आदरें ।
मार्गी या जनता–जनार्दनिं वरी एकात्मता निर्भरें ॥
तेणें षड्गुण हे तसे गुरुरूपें लाहोनि सच्चिन्मया ।
भोगूं श्रीगुरुपादपद्मयुगुलीं आनंद तो अक्षया ॥३॥

श्रीदत्तजयंती,
विभूतिमास,
दि २७-१२-१९४७

मंगेश रामचंद्र राकी

---

* सद्भक्ति–मंदिरांतील ज्या अधिष्ठित श्रीदत्तमूर्तीच्या दिव्यचरणीं हा 'उपोद्घात' श्रीदत्तजयंतीस समर्पण करण्यात आला, त्या मूर्तीचें छायाचित्र प्रकाशकांनीं 'आत्मनिवेदना'चे आरंभीं दिलें आहे

श्रीपांडुरंगाची मूर्ति ( वठार )



विठोबा ! मज मारिं तारीं । दीनावरी कृपा करीं ॥ध्रु०॥
धारी व्रत एकादशी । वरिच तूं पडशीसी ॥१॥
दृष्ट तूंची राम तूंची । देव-देवता सर्वहि तूंची ॥२॥
—श्रीशंकरसुधा ( श्रीभाईकृत )



"...ह. भ. प. शामराव लक्ष्मणबुवा गोसावी वठारकर हे श्रीएकनाथस्वामींचे वंशज असून...हा बहुमोल चरित्रग्रंथ प्रसिद्ध होण्याचें श्रेय...यानाच देणें अवश्य आहे "
—प्रस्तावना ( श्रीसाधुदास )

वटार गाव संपादन करणार
श्रीउद्धव गोसावी यांची समाधि (वटार)



॥ श्लोक ॥

वटारीं विराजे ज्याची समाधी ।
भजा रे त्यातें लावूनी उपाधी ॥
अती आवडे पूर्ण प्रेम चित्तें ।
नमस्कार माझा तया उद्धवातें ॥

# प्रस्तावना

प्रस्तुत "प्रतिष्ठान–चरित्र" हा श्रीएकनाथमहाराज यांचे चरित्रावरील अप्रसिद्ध ग्रंथ आज प्रथमच उजेडात येत आहे. कोल्हापूर संस्थानपैकीं तालुके हातकणंगले या गावाहून उत्तरेस सहा मैलांवर बुवाचें वठार या नांवाचें सुमारें चवदाशें वस्तीचें खेडें आहे. तें वारणा नदीचे काठीं वसलें असून त्यात सुमारें बारा तेरा ब्राह्मणांचीं घरें आहेत. या गांवीं सुप्रसिद्ध महाराष्ट्रीय संत श्रीएकनाथमहाराज यांचे वंशाची एक शाखा नांदत असून तिचा शोध इतिहास संशोधकांना अद्याप लागलेला नव्हता. या वंशातील आमचे विद्यमान गृहस्थ ह. भ. प. शामराव लक्ष्मणबुवा गोसावी यांचे संग्रहात मूळ पोथीची प्रत कैक वर्षें पडून होती. पोथीचा कागद जुना जिर्ण असून हस्ताक्षर एक टाकानें लिहिलेलें व्यवस्थित सुवाच्य आहे.

विद्वद्रत्न



राजकवि साधुदास

पानाची लांबी ८॥ इंच व रुंदी ६ इंच आहे. दोन्हीकडे समास सोडून नेटकेपणा आणिला आहे. लेखनांत मात्र अशुद्ध फार असून लेखकानें आपलें नांव– 'शामभटात्मज रामभटेन लिखित" असें देऊन शके १७१७ राक्षसनाम संवत्सरे आषाढ शुद्ध दशमी रविवार असा लेखन–समाप्तीचा काल सांगितला आहे. ग्रंथाचा मूळ लेखक प्रत्येक अध्यायाच्या शेवटीं "म्हणे कृष्णदास जगदानंद । नंदन श्रीनाथ पदारविंद । सेवोनि चरण मकरंद । सच्चिदानंद स्वयें झाला ॥" असा आपला निर्देश करतो. त्याची ओवी एकनाथी धाटणीची आहे. पण त्यानें आपल्या ग्रंथलेखनाचा काल दिला नाहीं, ही मोठ्या खेदाची गोष्ट आहे. तथापि नक्कल करणारा

जो रामभटात्मज रामभट तो आपण लिहिलेली नक्कल "उद्धवात्मज रामजी गोसावी वठारकर" याचेकरिता ही नक्कल केलेली आहे, असा स्पष्ट उल्लेख करितो. त्यावरून मूळ ग्रंथाच्या काल-निर्णयास थोडाबहूत आधार मिळाला आहे.

उपरोक्त ह. भ. प. रामराव लक्ष्मणबुवा गोसावी हे श्रीएकनाथस्वामींचे वंशज असून आश्चर्याची गोष्ट अशी कीं, त्यांचे संबंधीं माहिती रा. रा. आजगावकर व पांगारकर या दोघांही श्रीएकनाथस्वामींच्या चरित्र लेखकास मिळाली नाहीं इतिहास संशोधकांनाच जी माहिती मिळाली नाहीं ती अर्थातच केशव, महिपति यांच्यासारख्या भाविक ग्रंथकारांना मिळाली नसल्यास नवल नाहीं. वठारकर बुवांच्या संग्रहीं असलेल्या वंशावळीवरून आणि एका जुन्या कागदावरून या वठारकर गोसावी घराण्याची परंपरा पुढीलप्रमाणें निर्विवाद सिद्ध होते:—





उद्धव
गणेश (पंढरपूर)
यड्डूर
उद्धव (वठार गाव संपादन केला.)
मल्हार (यड्डूर)
त्रिंबक
शामजी
विश्वंभर ऊर्फ भाऊराव
रामचंद्र
जनार्दन ऊर्फ रावजी
गंगाधर
लक्ष्मण
विष्णू
गोपाळ
शिवराम ऊर्फ नामदेवबुवा
महादेव*
शामजी (विद्यमान मठपति)
कृष्णाजी उद्धव रघुनाथ गुरुनाथ मधुकर बाळकृष्ण
१ २ ३ ४ ५ ६
(सर्व विद्यमान–१ ते ६)


---

* निर्वंश झाला.

ही वडील घराण्याची आजपर्यंतची वंशावळ असून विद्यमान मठपति ह. भ. प. रामराव लक्ष्मणबुवा गोसावी यांचीं तीन चुलत घराणीं वठारास असतात. याशिवाय भाऊबदाचीं आणखी दोन घराणीं आहेत, पण त्यांचा प्रस्तुत चरित्राशीं संबंध नसल्यानें त्यांचा वंशवृक्ष येथें दिला नाहीं.

वरील वंशावळीपैकीं श्रीएकनाथमहाराजांचे पणतू गणेशबुवा हे कांहीं दिवस पंढरपुरास राहिले होते आणि तेथून ते श्रीकृष्णातीरीं वडुरास येऊन राहिले. वडुरास त्यांनीं वृत्ति मिळविली आणि आपल्या धाकट्या गिरजीबाचो वडुरास स्थापना केली. उद्धवबुवांनीं स्वपराक्रमानें एडक लाट येथें जमीन आणि चिकलवाड गांव अशी वृत्ति मिळविली आणि नंतर वठार गांव इ. सन १७०५ सालीं करवीर छत्रपती शाहूमहाराज यांजकडून संपादून तेथेंच ते स्थायिक झाले. उपरोक्त वठारचा वंश तो हाच वठार येथें आहे.

मूळ ओंवीबद्ध ग्रंथाचा लेखक कृष्णदास जगदानंद-नंदन हा कोण, कुठला आणि त्यानें हा ग्रंथ कधीं लिहिला याची नक्की माहिती अद्याप मिळाली नाहीं. पण ग्रंथाची नक्कल करणारा रामभट बिन शामभट यानें ही नक्कल उद्धवात्मज शामजी गोसावी वठारकर याचे करितां लिहिली आहे, असें म्हटलें आहे. वरील वंशावळीवरून उद्धवात्मज शामजी हे श्रीएकनाथ-महाराजांचे पासून सहावे पुरुष आहेत. अर्थात् प्रत्येक पिढी सुमारें तीस वर्षांनीं धरल्यास उध्दवात्मज शामजी याचा काळ शके १६७० चे सुमारास येतो. यावेळीं "प्रतिष्ठान-चरित्र" हा ग्रंथ नक्कल करून घेण्याइतपत मान्यता पावलेला असल्यामुळें त्याचा रचनाकाल पन्नास वर्षें तरी आधींचा मानणें भाग आहे, म्हणजे हा ग्रंथ कृष्णदास जगदानंद नंदन यानें सुमारें शके १६२० च्या आसपास लिहिलेला आहे, असें मानणें क्रमप्राप्त होतें. नंतर त्या ग्रंथाच्या एखाद्या प्रतीवरून श्रीएकनाथमहाराजांचे वंशज उद्धवात्मज शामजी यांनीं आपल्या पुण्यश्लोक पूर्वजांचें हें चरित्र नक्कल करून आपल्या संग्रहांत ठेविलें हें स्पष्ट होतें. अर्थात् श्रीएकनाथमहाराजांचे जुन्यातलें जुनें सुप्रसिद्ध

चरित्रकार जे केशव (शक १६८२) आणि महिपति (शके १६८४) यांच्या श्रीएकनाथमहाराज-चरित्रलेखनापूर्वी कमीतकमी ५०।६० वर्षे तरी श्रीएकनाथमहाराज यांचें हें चरित्र लिहिलें गेलें आहे. चरित्रांत आलेल्या नारिकमारीक तपशीलावरूनही चरित्र-लेखकाला श्रीनाथाच्या काळची पुष्कळच माहिती ऐकून व वाचून मिळाली असली पाहिजे, हें स्पष्ट दिसून येतें. कृष्णदास जगदानंद-नंदनानें ग्रंथरचनेच्या प्रारंभीं श्रीएकनाथस्वामींचे नातू जे उद्धवसुत त्यांना उद्देशून—

'जगीं नेष्ठ हा उद्धवो राजयोगी । मनावृत्ति हे अर्पिली पांडुरंगीं॥
कथा कीर्तनीं गातुतो नित्यरंगीं। नमानें स्मरें मी सदा अंतरंगीं॥१॥"

असा भक्तिभावपूर्वक निर्देश केला आहे त्यावरूनही या ग्रंथाच्या रचनेचा काळ शके १६२० च्या सुमारचा किंबहुना थोडा आधींचाच मानणें योग्य होत आहे.

प्रस्तुत चरित्र-ग्रंथाचे अध्याय अकरा (११) असून एकंदर ओंवीसंख्या ११३० आहे. भाषा अत्यंत सुबोध असून ओघवती आहे. या ग्रंथाचा विशेष हा कीं, ग्रंथकार श्रीनाथाच्या पश्चात् थोड्याच दिवसांनीं ग्रंथलेखनास प्रवृत्त झाला असल्यामुळें त्याला श्रीनाथांची दिनचर्या चरित्रांतील घटना वगैरेसंबंधीं तपशील पुष्कळच उपलब्ध झाले आणि ते सर्व त्यानें आपल्या श्रीनाथ-चरित्रांत आवश्यकतेनुसार स्पष्ट दिले आहेत. श्रीनाथांच्या चरित्रांतील कांहीं ठळक चमत्कार त्यानें दिले आहेत. पण त्यावर त्याचा मुख्य भर नसून श्रीनाथांची सकाळपासून रात्रीपर्यंतची दिनचर्या त्यानें इतक्या उत्कट स्वरूपांत मांडली आहे कीं, तिजवरून श्रीनाथांनीं प्रपंचांतच परमार्थ कसा सिद्ध करून दाखविला यांची रूपरेषा कोणाही सामान्य मानसास स्पष्टपणें कळून यावी. महिपतींच्या ग्रंथांत भाविकपणा पुष्कळ. अद्भुत चमत्कार वर्णन करण्याकडे त्याचा कल—किंवा त्याचे आधींचा चरित्रलेखक केशव काय—यांचा कल विशेष दिसून येतो; तसें कृष्णदास जगदानंद-नंदनानें

केलेलें नाहीं. हें त्याच्या ग्रथाचें वैशिष्ठ्य वाखाणण्याजोगें आहे. श्रीनाथ चरित्रातील घटना या ग्रथात दिलेल्या आणि महिपति-आजगावकर-पागारकर प्रभृतींनीं दिलेल्या यात अनेक ठिकाणीं पुष्कळच तफावत दिसून येते. अशा वेळीं श्रीनाथाच्या काळाला अत्यत जवळ असलेला हा चरित्रकाराचे प्रमाण मानला पाहिजे प्रस्तुत चरित्रग्रथाला "प्रतिष्ठान-चरित्र" असें नाव ग्रथकारानें दिलें आहे तें श्रीनाथाच्या वास्तव्यामुळें पैठणला आलेलें महत्त्व लक्षात घेऊनच दिलें असावें असें वाटतें.

असला हा बहुमोल ग्रथ इतका दीर्घकाल अधारात पडून राहिला, हें महाराष्ट्रीय भाविकाचें दुर्भाग्य होय. जत येथें राहणारे एक भाविक सद्गृहस्थ रावसाहेब अनत विष्णु खासनीस, रिटायर्ड सबजज्ज, यानीं या ग्रथाची वठार येथील मठात असलेली प्रत प्रथम पाहिली, आणि "केसरी", मगळवार ता. २।९।४१ इ, च्या अकात त्यानीं तिचा प्रथम जाहीर निर्देश केला. या निर्देशाकडे सागली येथील माझे मित्र ह. भ. प. रघुनाथ हणमत ऊर्फ बाबुराव कोटनीस याचें लक्ष गेल, आणि त्यानीं रावसाहेब खासनीस याचे मार्फत वठारचे मठातून या ग्रथाची मूळ प्रत सागलीस आणवून घेतली मठपति ह. भ. प. शामराव लक्ष्मणबुवा गोसावी याचे परवानगीनें या ग्रथाची नक्कल करणेंत आली. नतर काहीं दिवसानीं मुबई (जोगश्वरी) येथील सुप्रसिद्ध सत्पुरुष गुरु भ. प. श्रीमगेश रामचद्र टाकी ऊर्फ श्रीदादाभाईमहाराज हे कोटनीस याच्या "कैवल्य धामात" उत्सवास आले असताना त्याच्या अवलोकनात ही प्रत आली आणि त्यानीं हा ग्रथ छापून काढण्याचें मनात आणिलें. वठारकर बुवा हे प्रथम या ग्रथाचे प्रसिद्धीस प्रतिकूल होते, पण इतका सव योगायोग जमून आल्यावर त्यानींही उदार मनानें या ग्रथाच्या प्रसिद्धीस परवानगी दिली आणि आता हा ग्रथ महाराष्ट्रीय भाविक वाचकाच्या उपयोगाकरिता प्रसिद्ध झाला आहे, ही श्रीनाथमहाराजाचीच कृपाच म्हटली पाहिजे.

प्रस्तुत चरित्रग्रंथाचा विशेष काय हें वर सांगितलेंच आहे आणि त्याची यथार्थता वाचकांना ग्रंथवाचनानंतरच चांगल्या तऱ्हेनें पटणार आहे. तथापि श्रीनाथचरित्रांत इतर चरित्रकारांनीं वर्णन केलेल्या कांहीं घटना वस्तुस्थितीस सोडून किती विकृत स्वरूप पावल्या आहेत याची कल्पना येण्याकरितां कांहीं थोड्या घटनांचे निर्देश येथें करणें अप्रासंगिक होणार नाहीं. इतर चरित्रकारांनीं श्रीनाथ आपल्या आजोबांना सोडून श्रीजनार्दनस्वामींकडे पळून गेले असें विधान केलें आहे. पण खरी गोष्ट अशी आहे कीं, चक्रपाणींनींच त्यांना श्रीजनार्दनस्वामींकडे जावयास सांगितलें (अध्याय १ ला). इतर चरित्रकारांनीं श्रीनाथांचें कुटुंब कर्नाटकांतील होतें, असें अदाजिक विधान केलें आहे. पण प्रस्तुत चरित्रकारानें श्रीनाथाच्या पत्नी गिरिजाबाई या दौलताबाद येथील विश्रिकमशास्त्री यांची कन्या असा निश्चित उल्लेख करून सदर लग्न श्रीजनार्दनस्वामींनीं आपल्या नजरेखालीं घडवून आणिलें, असें सांगून लग्नाचा बारिकसारीक तपशीलही दिला आहे (अध्याय ४ था). परिसा भागवताची गोष्ट अनेक चरित्रकारांनीं श्रीनामदेव यांच्या नांवावर दिली आहे, पण प्रस्तुत चरित्रांत ती श्रीनाथाच्या नांवावर दिलेली असून गोष्टीच्या अंतरंगघटनेवरून ती श्रीनाथचरित्रांतच घडलेली असणें अधीक संभवनीय वाटतें (अध्याय ७ वा). उलटपक्षीं श्रीनाथाचे समकालीन सत्पुरुष श्रीदासोपंत यांची व श्रीनाथाची भेट यासारख्या सुप्रसिद्ध कांहीं घटना प्रस्तुत चरित्रकारानें वगळल्या आहेत, हेंही लक्षांत ठेवण्यासारखें आहे. चरित्रकाराचा उघड उघड हेतु श्रीनाथाच्या अद्भुत चमत्कारांनीं भाविकांना चकित करण्यापेक्षां श्रीनाथाची नित्याची दिनचर्या त्यांच्यापुढें मांडून श्रीनाथ कशी तपश्चर्या करून आपल्या जगमान्य पदवीस चढले, हें दाखविण्याचाच असल्यामुळें वरील प्रकार घडला असावा असें वाटतें.

महाराष्ट्रीय साधुसंतांत श्रीएकनाथस्वामींना एक विशिष्ट स्थान मिळालेलें आहे आणि तें श्रीतुकोबारायांनीं–"**जनार्दन एकनाथें। ध्वज केला भागवतें ॥१॥**" या शब्दांत व्यक्त केलें आहे. श्रीतुकाराम-श्रीरामदासांप्रमाणें

श्रीनाथानीं प्रपंचाविषयीं आत्यंतिक उदासीनता दाखविली नाहीं; तर त्यांनीं प्रपंचात राहून आपला प्रपंचच परमार्थरूप केला, हें त्यांच्या चरित्रानें वैशिष्ट्य सांगता येईल. हें वैशिष्ट्य प्रस्तुत चरित्रग्रंथात अत्यंत यथार्थतेनें दाखविण्यात आलें आहे. असा हा बहुमोल चरित्रग्रंथ प्रसिद्ध होण्याचें श्रेय रावसाहेब खासनीस, ह. भ. प. बाबुराव कोटनीस वगैरे मंडळींत विभागून गेलें असलें, तरी या श्रेयाचा फार मोठा भाग गुरु भ. प. श्रीदादामहाराज आणि ह. भ. प. शामराव लक्ष्मणबुवा गोसावी वडारकर यानाच देणें अवश्य आहे. त्यांनीं श्रीनाथ-भक्ताकरिता हा ग्रंथ छापून भाविक वाचकांना एक नित्याची मेजवानी करून ठेविली आहे, तिचा महाराष्ट्रीय भाविक वाचक यथोचित उपयोग करून घेतील असा भरवसा वाटतो.

मार्गशीर्ष शुद्ध एकादशी<br>'श्रीगीताजयंत', शके १८६१ } साधुदास

# अनुक्रमणिका

त्यांच्याबरोबर एकनाथस्वामींना पैठणास जाण्यास निरोप—जनार्दन-स्वामींची दौलताबादेस बदली.

५ ४५

एकनाथस्वामींचे आजे चक्रपाणि यांचा मृत्यु—त्यांच्या पत्नीचें सहगमन—एकनाथस्वामींची पैठण येथील दिनचर्या—दहा घटिका-पर्यंत स्नान—गुरुपूजन, नंतर संध्या वैश्वदेवादि नऊ कर्मे—पुढील दहा घटिका भोजन—नंतरच्या दहा घटिका पुराण-श्रवण—रात्रीं दहा घटिका स्नान, पूजन व भोजन—नंतर दहा घटिका कीर्तन—अडीच घटिका झोप—नंतर ब्रह्मचिंतन.

६ ५५

एकनाथस्वामींचें आत्मसाधन—सर्वांभूतीं भगवत्भावाची प्रचीति—कैकाड्यांची शंभर गाढवें एकनाथस्वामी स्नान करीत असतांना येतात—एकनाथस्वामी त्यांना पाणी पाजतात—महारोगी ब्राह्मण व्यथेनें कंटाळून यात्रेस निघाला असतां पैठणास येतो—त्याला झालेला दृष्टांत—तो एकनाथस्वामींकडे येतो—भागवत-श्रवण आणि शंभर गाढवांना जलपान यांतून कोणतें तरी एक पुण्य मागतो—एकनाथस्वामी त्याला भागवत-श्रवणाचें पुण्य आणि चरणोदक देतात—ब्राह्मणाची व्यथा नाहींशी होते.

७ ६५

एकनाथस्वामींची समदृष्टी—पंढरपूरचा परिसा भागवत ब्राह्मण—त्यानें केलेली रुक्मिणीची आराधना—देवी त्याला परीस देते—ब्राह्मण महायात्रेला निघतो—बरोबर परीस घेतो—परिसाच्या जप-णुकीविषयीं विवंचना—पैठणास येऊन एकनाथस्वामींकडे सांभाळण्या-करितां परीस देतो—एकनाथस्वामी तो गंगेंत टाकितात—ब्राह्मण अर्धी यात्रा टाकून परत येतो—एकनाथस्वामींकडे परिसाची मागणी—परीस डोहांत टाकिला हें ऐकून ब्राह्मणानें घेतलेलें

घरीं—एकनाथस्वामी त्याला गंगेवर नेतात—गंगेतील सगळेच दगड परीस झाल्याचा साक्षात्कार—ब्राह्मणाचा पश्चात्ताप—ब्राह्मण परीस ब्रह्मार्पण करून पुनश्च महायात्रेस जातो.

## उपांग-विषयानुक्रमणिका



## छायाचित्रें



---

# शुद्धिपत्रक

| अशुद्ध | शुद्ध | अध्याय | ऑंवी | पृष्ठ |
|---|---|---|---|---|
| नमर | नगर | १ | १७ | ५ |
| ब्राम्हणाचा | ब्राह्मणाचा | २ | १२ | १४ |
| प्राक्षाळी | प्रक्षाळी | ३ | १७ | १५ |
| मार्मिक | मार्गिक | ३ | ६३ | २९ |
| सद्बुद्दी | सद्बुद्धी | ३ | ७३ | ३० |
| जनास | जनासी | ३ | ७६ | ३० |
| येक | येका | ४ | ३२ | ३७ |
| जनार्दन | जनार्दन | ४ | ३२ | ३७ |
| सेवके | सेवके | ४ | ३७ | ३७ |
| घठिका | घटिका | ४ | ७७ | ४१ |
| विवाद | विशद | ४ | ८६ | ४१ |
| प्रतिष्ठानासी बहिला | प्रतिष्ठानासी जाय वहिला | ४ | ९५ | ४५ |
| प्राक्षाळून | प्रक्षाळून | ५ | ८ | ४५ |
| प्राक्षाळून | प्रक्षाळून | ६ | ४ | ५५ |
| येकमका | येकमेका | ६ | ९६ | ६३ |
| मोहार | मंहार | ६ | १०० | ६४ |
| श्रीगणराय | श्रीगणेशाय | ७ | १ | ६५ |
| निजदष्टा | निजदष्टीं | ७ | ८१ | ७२ |
| वाहेर | बाहेर | ८ | ३९ | ७८ |
| सर्वाभूती | सर्वाभूतीं | ८ | ४० | ७८ |
| क्षानंदले | आनंदले | ८ | ४३ | ७८ |
| समस्तांसि | समस्तांसि | ८ | ४५ | ७८ |
| जलो | जळो | ८ | ५४ | ७९ |

दृष्टांत—सदर ब्राह्मण पैठणास येतो—एकनाथस्वामींची व ब्राह्मणाची भेट—श्रीखंड्या गुप्त होतो—ब्राह्मणाचें समाधान—ग्रंथसमाप्ति.

## उपांग–विषयानुक्रमणिका



## छायाचित्रें

(१) श्रीदत्तात्रेयांची स्वयंभू मूर्ति (२) आमची परंपरा-त्रयी (३) ब्रह्मीभूत श्रीतात्यासाहेब कोटनीस महाराज (४) गु. भ. प. श्रीबाबुरावजी कोटनीस महाराज (५) श्रीपांडुरंगाची मूर्ति ( वठार ) व विद्यमान मठाधिपति (६) श्रीउद्धव गोसावी यांची समाधि ( वठार ) (७) श्रीएकनाथ महाराज (८) श्रीएकनाथ महाराजांच्या नित्य पूजनांतील श्रीराहरखुमाईसह व दिव्य वस्त्रालंकारविभूषित श्रीविजयी विठ्ठलाची मूर्ति (९) श्रीजनार्दनस्वामींच्या पादुका (१०) श्रीगौतमी अथवा श्रीगोदावरी (११) श्रीखंड्याचा रांजण (१२) श्रीएकनाथ महाराजांची समाधि (१३) श्रीएकनाथ महाराजांच्या पादुकांचे आंगठे (१४) श्रीएकवीरा.

# शुद्धिपत्रक

| अशुद्ध | शुद्ध | अध्याय | ऒंवी | पृष्ठ |
|---|---|---|---|---|
| नमर | नगर | १ | १७ | ५ |
| ब्राम्हणाचा | ब्राह्मणाचा | २ | १२ | १४ |
| प्राक्षाळी | प्रक्षाळी | ३ | १७ | १५ |
| मार्मिक | मार्गिक | ३ | ६३ | २९ |
| सद्बुद्धी | सद्‌बुद्धी | ३ | ७३ | ३० |
| जनास | जनासी | ३ | ७६ | ३० |
| येक | येका | ४ | ३२ | ३७ |
| जनार्दन | जनार्दन | ४ | ३२ | ३७ |
| सेवके | सेवके | ४ | ३७ | ३७ |
| घठिका . | घटिका | ४ | ७७ | ४१ |
| विवाद | विशाद | ४ | ८६ | ४१ |
| प्रतिष्ठानासी पहिला | प्रतिष्ठानासी जाय पहिला | ४ | ९५ | ४५ |
| प्राक्षाळून | प्रक्षाळून | ५ | ८ | ४५ |
| प्राक्षाळून | प्रक्षाळून | ६ | ४ | ५५ |
| येकमका | येकमेका | ६ | ९६ | ६३ |
| भांडार | भंडार | ६ | १०० | ६४ |
| श्रीगणशाय | श्रीगणेशाय | ७ | १ | ६५ |
| निजदृष्टा | निजदृष्टी | ७ | ८१ | ७३ |
| बाहेर | बाहेर | ८ | ३९ | ७८ |
| सर्वांभूतीं | सर्वांभूतीं | ८ | ४० | ७८ |
| आनंदलें | आनंदले | ८ | ४३ | ७८ |
| समस्तांसि | समस्तांसि ' | ८ | ४५ | ७८ |
| जलो | जळो | ८ | ५४ | ७९ |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| साह्रित्य | साहित्या | ९ | ३६ | ८८ |
| ब्राह्मणा | ब्राह्मण | ९ | ७१ | ९१ |
| स्तानंदें | स्वानंदें | ९ | ८२ | ९२ |
| त्यास | त्यासि | १० | १२ | ९६ |
| साधूची | साधूंची | १० | ४६ | ९९ |
| उठवीत | उठवीत | ११ | ७५ | ११० |
| आणि ती | आणि पुढें तीं | ४ | टीप १ | ३८ |
| पंढपूरचा | पंढरपूरचा | ७ | | ६५ |
| श्रीउद्धवार्पणमस्तु | ॥ श्रीउद्धवार्पणमस्तु ॥ | ७ | | ७४ |
| ब्राह्मण | ब्राह्मण | १० | | ९४ |
| २५—२६ | २६—२७ | ११ | टीप | १०८ |

छापखान्यासाठीं तयार होऊन आलेल्या प्रतींतून नजरचुकीनें राहिलेले पुढील दोन अधोरेखित चरण येथें देण्यांत येत आहेत :—

धन्य येवकनायाचें वदन । धन्य येवकनायाचें घ्राण ।
धन्य येवकनायाचे कान । सावधान श्रवणार्थ ॥ —अ ५–ओं. २७; पृ ४७
जाऊं विसरला वैकुंठासी । अथवा जावें द्वारकेसी ।
हें ही विसरला हर्षवेगीं । भक्तप्रेमासी लाचावला ॥— अ. ११–ओं. २१; पृ. १०६



## श्रीएकनाथमहाराजांचा अखेरचा दिव्य संदेश*

आम्हीं संसारा अगत्य येणें । करोनी हरिभक्ति जडजीव उद्धरणें

साच असतें जरी, तरी धाक धरितों चित्ता ।

भवभयप्राप्ति समूळ मिथ्या ॥ १ ॥

जैं धर्माची वाट मोडे । अधर्माची शीग चढे ॥

तैं आम्हां येणें घडे । संसारस्थिति ॥ २ ॥

नानामतें पाखांडें । कर्मठपा अति बांडें ।

त्यांची ठेचावीं तोंडें । हरिभजनें ॥ ३ ॥

जें जें हरीचें लीलाचरित । तें तें माझेंचि स्वतंत्र ।

देव भक्त एकत्र । भेद नाहीं ॥ ४ ॥

जो जो अवतार हरि धरी । तो तो मीच अवधारीं ।

हरिनाम गजरीं । जगदोद्धारीं ॥ ५ ॥

सर्वांभूतीं भगवद्भावो । हा भक्तीचा निजनिर्वाहो ।

धर्माचा आग्रहो । वाढणें ॥ ६ ॥

सर्वांभूतीं दया शांती । प्रतिपाळावी वेदोक्ती ।

हेंही एक निश्चितीं । करणें आम्हां ॥ ७ ॥

लीलाविग्रही भगवंत । तया म्हणती नित्यमुक्त ।

आम्हीं काय तेथें । वेगळे असो ॥ ८ ॥

विश्वरूप सृष्टि । अर्जुना दावी दिठी ।

भिन्न भेदाची गोष्टी । बोलूं नये ॥ ९ ॥

वत्सहरणाचें चरित्र । वत्सें गोवळे स्वयें स्वतंत्र ।

पावे पायतणें कटिसूत्र । आपण जाला ॥ १० ॥

एकाजनार्दनीं । विश्वरूप गोविंद ।

भेद धरी तो चित्तीं । निंद्याहूनी अति निंद्य ॥ ११ ॥

---

* Last Word

## श्रीएकनाथमहाराजांनीं मनास श्रीसद्गुरुस्मरणपूर्वक केलेला हितोपदेश

### अभंग

न सोडीं रे मना गुरु जनार्दना ।
संसार-बंधना सोडवील ॥ १ ॥
संसार अजगर झोंबला विखार ।
धन्वंतरी थोर जनार्दन ॥ २ ॥
जनार्दनऐसी माउली परियेसीं ।
बहु कष्ट सायासीं जोडीयेली ॥ ३ ॥
जनार्दनें रंक तारियेला एका ।
संसारीं हा सखा जनार्दन ॥ ४ ॥

### ओंवी

मी जरी नाठवें जनार्दनासी । तरी तो विसरों नेदीच आपणासी ।
हटेंच देतसे आठवणेसी । अहर्निशीं सर्वदा ॥



गुरु दत्तात्रेय अवधूता ।
जनार्दनस्वामी एकनाथा ॥

# प्रतिष्ठान—चरित्र

## अध्याय १ ला

[ एकनाथस्वामींचे वाडवडील—एकनाथस्वामींचा मूळ-नक्षत्रावर जन्म—आईबापांचा मृत्यु—आजोबांनीं केलेलें संगोपन—व्रतबंध—आजोबा एकनाथ-स्वामींना जनार्दनस्वामींच्याकडे जाण्यास सांगतात—एकनाथस्वामींचें प्रयाण ]

श्रीगणपति प्रसन्न ॥ श्रीगुरुमूर्ति प्रसन्न ॥ श्रीपांडुरंग प्रसन्न ॥

प्रीयतां देवो भगवान् रुक्मिणी पतिः ॥
श्रीपांडुरंगः पूर्वेषामस्माकं कुलदैवतं ॥ १ ॥

जगीं श्रेष्ठ हा उद्धवो राजयोगी ॥
मनोवृत्ति हे अर्पिली पांडुरंगीं ॥
कथाकीर्तनीं गातु तो नित्य रंगीं ॥
तयाते स्मरे मी सदा अंतरंगीं ॥ २ ॥

ओं नमो स्वामी अद्वया । येकनाथा निरामया ।
सगुणनिर्गुणसमन्वया[१] । नमन पाया निजभावे ॥ १ ॥
अनन्यभावें तुझें नमन । करितां नाठवे मी-तूं-पण ।
नमनाचें अगाध महिमान । अति गहन तिहीं
लोकीं ॥ २ ॥ नमनें संकल्पासि पडिली तुटी । विकल्पाच्या
सुटल्या गाठीं । श्रीगुरूच्या नमनासाठीं । आनंद सृष्टी न
समाय ॥ ३ ॥ नमनें मीपण हरिलें । सेखीं[२] तूपणही भक्षिलें ।

---

१ सगुण निर्गुणांचा मेळ घालणारा. "सगुणाचेनि आधारें । निर्गुण पाविजे विचारें ॥" असें समर्थांनीं 'दासबोध' ग्रंथांत सांगितलें आहे.

२ शेवटीं, अखेरीस.

मी-तूं-विणें जे संचलें । तें नमन योलिलें गुरुचरणीं ॥ ४ ॥ गुरुचरणीं जें अनन्य नमन । तें नमन दाटलें त्रिभुवन[1] । व्यापून उरलें पूर्णपण । स्वानंदघन निजबोधें ॥ ५ ॥ नमन केवल परात्पर । शुद्धबुद्ध निर्विकार । नमन क्षरीं अक्षर[2] । त्याहुनि पर नमन योलिजे ॥ ६ ॥ नमनें तरला अक्रूर । सर्वभूतीं नमन तत्पर । नमनें तरले भवसागर । संत अपार तिहीं लोकीं ॥ ७ ॥ भक्ति घेऊनि कडीयेसी[3] । भाविती स्तुति नमनापासी । चारी मुक्ति होती दासी । अहर्निशि स्वानंद ॥ ८ ॥ नमन सुखाचा धणी । श्रीयेकनाथ कैवल्यदानी । नमन अर्पिता त्याचे चरणीं । पूर्णपणीं प्रकाशिलें ॥ ९ ॥ संतुष्टोनि सद्गुरुनाथें । कृपेनें मस्तकीं ठेविला हातें । तेणें लाधलों निजसुखातें । उदार हस्त श्रीगुरूचा ॥ १० ॥ थोर हाताचा प्रताप । हातें छेदिला त्रिविधताप[4] । शांति प्रगटली अमूप । हातें चित्स्वरूप सापडलें ॥ ११ ॥ हातें छेदिलेसें रायातें[5] । हातें दवडीलें

---

१ त्रिभुवनीं अशा सप्तमीच्या अर्थीं प्रथमा विभक्ति घालण्याची पद्धत या चरित्रांत अनेक ठिकाणीं आढळते.

२ चंचल अशा जगतांत अक्षर वस्तु भरलेली आहे, या भावेंत सुद्धां जो द्वैतबोध होतो तोही नमनांत रहात नाहीं, असा आशय.

३ भक्तीचा भोपळा कमरेला बांधून नमनाचा मार्ग भवसागर तरून जाण्याला योग्य मानतात. स्तुति म्हणजे मार्ग.

४ अध्यात्मिक, आधिभौतिक आणि आधिदैविक असे तीन प्रकारचे ताप मनुष्य प्राण्याला पीडा करतात, असें सांगितलें आहे.

५ काळरूपी राजाला

चीपयातें। हातें उठवीलें प्रपंचातें। हातें परमार्थ हाता आला ॥ १२ ॥ नवल हाताचें महिमान । नयनीं कोंदलें बोधांजन । तेणें सर्वभूतीं समान । पहातेची[1] पाहणें होवोनि ठेलें ॥ १३ ॥ असो सद्गुरूची अतर्क्य खूण। हे खूण जाणती संतसज्जन। आपणा ऐसें जग पाहणें । हें भांडवल पूर्ण संतांचें ॥ १४ ॥ म्हणवूनि जे जे संतजन । तयांसि माझें लोटांगण । त्यांचे वंदूनि श्रीचरण। सांगेन निरूपण श्रोतया ॥ १५ ॥ हें प्रतिष्ठान चरित्र । महापातक्या करी पवित्र। जे वाचिती हें चरित्र । पावन वगत्र[2] तयाचें ॥ १६ ॥ प्रत्यक्ष व्यासो नारायण । प्रतिष्ठानि अवतरला जाण । गुरुभक्तीचें महिमान । दाविलें संपूर्ण जगामाजी ॥ १७ ॥ गंगातीरीं[3] प्रतिष्ठानीं । अवतरला श्रीव्यासमुनी । भानुदासाचा कुलमणी । नामाभिधानी येकनाथ ॥ १८ ॥ भानुदास सुताचासुत । सूर्यनामा वीर[4] ख्यात । त्याचे उदरीं येकनाथ ।

---

१ पहाणारा जीव पहाण्याची वस्तु जें ब्रह्म तें स्वतः होऊन राहिला.

२ वगत्र म्हणजे वक्त्र, तोंड. असलीं अशुद्धें या ग्रंथांत अनेक आढळतात.

३ गोदावरीच्या तीरावर. गोदावरीस गौतमी गंगा हें नांव प्रसिद्ध आहे.

४ या विधानावरून एकनाथस्वामींचे वडील सूर्यनारायण यांनीं शिपाईगिरी केली असावी असें दिसतें.

जन्म निश्चित पावला ॥ १९ ॥ संवत्सरीच गेली माता । तृतीय वरुषीं गेला पिता । तया बाळका अनाथा । प्रतिपाळिता दिसेना ॥ २० ॥ पितयाचा पिता । चक्रपाणी प्रतिपाळिता । सप्तवरुषें[२] तया भरतां । व्रतबंध तत्त्वता पैं केला ॥२१॥ तो चक्रपाणि सुसीळ ब्राह्मण । स्वयं हरिभक्त परायण। अखंड श्रीहरीचें ध्यान । चित्तीं चिंतन श्रीहरीचें ॥ २२ ॥ अखंड अंतरीं आत्मस्थिती । बाह्य उभविल्या नवविधा भक्ती । हे चक्रपाणीची ख्याति । त्रिजगतीं वानिजे ॥ २३ ॥ ऐसें भक्तिसुखाआत । आयुष्य वेचिलें निभ्रांत । परी वृद्ध जालें बहुत । शरीरांत शक्ति नाहीं ॥ २४ ॥ मग पाचारूनी येकनाथ । चक्रपाणी जाला सांगत । म्हणे आमुच्या वंशांत । तूं येकत्वें येकला ॥ २५ ॥ म्हणे आमुचे भरले पूर्ण दिवस । आम्हां जाणें निजधामास । आतां तुझ्या संरक्षणास । तुज

१ एकनाथस्वामींना जन्मत मूळ नक्षत्र होते, त्यामुळें पहिल्याच वर्षी त्याची आई आणि तिसऱ्या वर्षी त्याचे वडील सूर्यनारायण हे दिवगत झाले मूळ नक्षत्राची शांति केली होती पण तिचा कांहीं उपयोग झाला नाहीं, असें खुद्द एकनाथ स्वामींनीच एका अभंगात सांगितले आहे —

“ मुळीच्या मुळा एका जन्मला । मायबापें थोर धाक घेतला ॥ १ ॥
कैसें मूळ नक्षत्र आलें कपाळा । स्वयें लागलों दोघांच्या निर्मूळा ॥ २ ॥
शांती करता अवघ्याची जाली शांती । मुळीं लागोनीया लाविली ज्योती ॥३॥
एकाजनार्दनीं मुळांच्या गोठीं । मायपगढ सगळा बापाचे घाटी ॥ ४ ॥ ”

एकनाथस्वामींचे आईबाप अनुक्रमें पहिल्या व तिसऱ्या वर्षी दिवगत झाले ही निश्चित स्वरूपात या ग्रंथात नवीन माहिती दिलेली दिसते

२ एकनाथस्वामींची मुंज सातवे वर्षी झाली, हें यावरून स्पष्ट दिसते

कोण्हास निरवावें ॥ २६ ॥ तरी आहे येक विचार। अमदावती[1] नाम नमर। जेथें जनार्दन साधू थोर। अति उदार सुखदाता ॥ २७॥ श्रीदत्तात्रेय आदिपुरुष। तोचि चंद्रशेखर प्रत्यक्ष। त्या चंद्रशेखराचा निःशेष। पूर्ण शिष्य जनार्दन ॥ २८॥ त्याचा अतर्क्य निजबोध। स्वप्नीं नेणे कदापि भेद। समत्वें पावला अभेद। तो शुद्ध साधू परमार्थी ॥ २९॥ तो परमार्थी साधू मूर्तिमंत। प्रपंचीं पाहतां श्रीमंत। अमदावती नगरांत। स्वामित्त्व चाले तयाचें ॥ ३०॥ तो तेथील स्थाईक। तेंचि त्याचि मिरासी देख। जनार्दना-वाचोनि आणिक। आम्हांसि देख मानेना ॥ ३१॥ जनार्दना शरण जासी। सर्व सुखाचें सार लाधसी। हें सत्य मानलें आम्हांसी। निश्चयेंसीं निर्धार ॥ ३२॥ ऐकोनि वृद्धाचें वचन। येका हरिखला आपण। नमस्कारुनी दोन्ही चरण। काय आपण बोलतु ॥ ३३॥ म्हणे स्वामी सांगितलें स्वाहित। तें आम्हांसि मानिलें निश्चित। मी गेलिया तुम्हां दोघांत। ते संरक्षणार्थ दिसेना ॥ ३४॥ तुम्हां वृद्धांतें टाकोनी जातां। विश्व हंसेल सर्वथा। तुमच्या वियोगाची वेथा[2]। मज तत्त्वता नावरे ॥ ३५॥ वृद्धापकालीं तुमची सेवा। करणें आवडे हेचि देवा। हेचि आवडी माझिया जीवा। सत्य सद्भावा स्वानंदें ॥ ३६॥ भावें करितां पितृभक्ति।

१ हल्लींचें अहमदनगर.

२ व्यथा, वेदना.

उणें काय त्रिजगतीं । पितृभक्तिची ख्याति । श्रुति बोलती पुराणें ॥ २७ ॥ कुर्कुट[1] नामा ब्राम्हण । तो पितृभक्त होता जाण । तीर्थें येवोनि आपण । वोळगती अंगण तयाचें ॥ २८ ॥ झाडींफिडीं[2] करिती येक । सडासंमार्जन कौतुक । ठाइ मुद्रा ठेविती देख । प्रत्यक्ष पुंडलीकें पाहिलें ॥ ३९ ॥ सांडुनिया मातापिता । पुंडलीक चालिला महातीर्था । कुर्कुटा घरीं वस्ती होता । तों अवचिता त्या[3] देखिल्या ॥ ४० ॥ पुंडलीक म्हणे तुम्ही कोण । येरू हासोनि बोलिल्या पूर्ण । तुम्ही कोण्हाचेहो कोण । कोठवरी गमन मांडिलें ॥ ४१ ॥ पुंडलीक म्हणे जाउं यात्रे । तीर्थवासी आम्ही पवित्र । येथें वस्तीस राहिलों मात्र । तव विचित्र देखिलें तुम्हां ॥ ४२ ॥ तुम्ही कोणाच्या नारी । दिसतसा परम सुंदरी । दास्यत्व करां याचे द्वारीं । हे निर्धारी मज सांग ॥ ४३ ॥ मग बोलिल्या त्या वनिता । तूं जातोसी ज्या तीर्था । तीं तीर्थेंचि आम्ही तत्त्वता । आलों सर्वथा सेवेसी ॥ ४४ ॥ गंगा यमुना सरस्वती । त्रिवेणी आलों निश्चिती । देखोनि कुर्कुटाचि भक्ती । प्रेमप्रीती भाळलों ॥ ४५ ॥ तुजसारिखे अभागी नर । यात्रे येताति

---

१ कुकुटस्वामी. यांच्या स्मरणानें दु.स्वप्न शुभ फल देतें अशी प्रसिद्धी आहे. "वाराणस्या दक्षिणे भागे कुकुटो नाम वै द्विजः । तस्य स्मरणमात्रेण दुःस्वप्नः सुखदो भवेत् ॥ १ ॥"

२ केर काढणें, झाडझूड.

३ नद्या, तीर्थें वगैरे.

अपार। तुवां सांडिलें पितृभजन सार । श्रम अपार भोगावया ॥ ४६ ॥ पितृभजनीं ज्याची प्रीती । तो येक मानला आमुचे चित्तीं । हे कुर्कुटासीच घडली भक्ती । येन्हवीं त्रिजगतीं दुर्लभ ॥ ४७ ॥ रडताति पडताति मातापिता । शोकदुःखें पडली तत्त्वता । त्यांसि सांडोनी आलासि तीर्था । लाज सर्वथा तुज नाहीं ॥ ४८ ॥ ऐसे बोलोनी त्रिवेणी । अदृश्य जाल्या तत्क्षणीं । पुंडलीक अनुतापला मनीं । उपदेशु कानीं ऐकतां ॥ ४९ ॥ मग कुर्कुटासी करोनि नमन । म्हणे धन्य धन्य तूझें भजन । तीर्थें बोळंगती अंगण । तुझें महिमान कळेना ॥ ५० ॥ आतां करीतों नमस्कारु । पितृभजना तूं मज गुरु। पुन्हा करोनि नमनादरु । निघे सत्वरु पुंडलीक ॥५१॥ माघारें लोहदंडासि[१] आला । पितरासि नमस्कार केला । मग सेवेसि विनटला । अनन्य जाला भक्तीसी ॥ ५२ ॥ ऐकोनि पुंडलीकाची भक्ती । स्वयं उतरले वैकुंठपती । हे पितृभक्तीची ख्याती । श्रुती बोलती पुराणें ॥ ५३ ॥ सांडूनिया वैकुंठ । स्वयं आलें वैकुंठपीठ । पुंडलीक हा महाधीट । मागें वीट भिरकाविली ॥ ५४ ॥ ते घेवोनिया ईट[२] । त्यावरी समचरण जोडिले नीट । देव विसरला वैकुंठ । अद्यापि तिष्ठे भीमातीरीं ॥ ५५ ॥ जेथें राहिला वैकुंठपीठ । तेथेंचि रचिलें भूवैकुंठ । वार्षिकी यात्रा संतश्रेष्ठ । नाचती सुभट हरिकीर्तनीं ॥ ५६ ॥

---

१ पंढरपूरचें विठोबा येऊन राहण्याचे अगोदरचें नांव.

२ वीट.

विठ्ठल नामाचा कल्लोळ । संत गर्जती मृदंग टाळ । दिंड्या पताका समेळ । हरिखें गोपाळ नाचती ॥ ५७ ॥ हे पितृभक्तीची ख्याती । देवें दाविली त्रिजगतीं । ऐसें कळोनि न करिती भक्ती । ते मंदमती अभाग्य ॥ ५८॥ ऐसें पितृभक्तीचें महिमान । आनायासें मज घडलें जाण । तुम्ही त्याचें जन्मस्थान[1] । तुमचे श्रीचरण सेव्य आम्हां ॥ ५९ ॥ ऐकोनि येकनाथाचें वचन । चक्रपाणी सुखावला आपण । माझा येका अतिसज्ञान । अंतरीं खूण बाणली ॥ ६० ॥ ऐकोनि गोड बाळभाषण । भानुसुतां आलें स्फुराण । हरिखें देवोनि उड्डाण । येकात्मता जाण आलिंगिला ॥ ६१ ॥ बाळा जें जें बोलिलास । तें तें पावलें स्वधर्मास । ऐकोनि सुख जालें आम्हांस । प्रेम सौरस भक्तीचा ॥ ६२ ॥ आजिपरियंत केली भक्ति । ते आम्हां पावली निश्चितीं । आतां जावें जनार्दनाप्रति । अमरावती नगरासी ॥ ६३ ॥ पितृस्वरूपी[2] जनार्दन । हें श्रुतिवाक्य प्रमाण । त्याचें केलिया अनन्य भजन । तें आम्हांसि जाण पावलें ॥ ६४ ॥ चक्रपाणी आणि जनार्दन । नांव भिन्न स्वरूप

१ एकनाथस्वामींची मातापिता त्यांच्या लहानपणींच निवर्तलीं होतीं पण पित्याचें जन्मस्थान जे आजोबा त्यांची सेवा करण्यांत पितृसेवा करण्याचें पुण्य अनायासें आपणास लाभलें असा एकनाथस्वामींचा आशय.

२ जनार्दनस्वामी भवसागरांतून पार पडणार असल्यामुळें त्यांना पितृस्वरूपी म्हटलें आहे. तारक सद्गुरु यांना श्रुतींनीं पित्याचा मान दिला आहे.

"ते तमर्चयन्तस्त्वं हि नः पिता योऽस्माकमविद्यायाः परं पारं तारयसीति ॥"

—प्रश्नोपनिषद् ६।८

अभिन्न । ऐसी येकात्मक साधून । अनन्य भजन करावें ॥ ६५ ॥ येकात्मता आलिया हाता । नाठवे भेदाची वार्ता । अभेद भावें भजन करितां । येकात्मता पुढें तिष्टे ॥ ६६ ॥ येकात्मता पावावयास । योगी सीणती योगाभ्यास । सांख्य योग संन्यास । नाना सायास साधनाचे ॥ ६७ ॥ तूं मुष्टीचा[१] येकात्म येका । आमुचे वंशीं आलासी देखा । आतां सेवि या भक्तिसुखा । जें तींहीं लोकां अति वंद्य ॥ ६८ ॥ जेवि मार्गस्थ चालिजे वाटे । त्यासी वस्तीपडे अवचट । येरे दिवसीं त्याचि वाटे । निघे सुभट निःशंक ॥ ६९ ॥ तेवी तूं परमार्थ दिवटा । स्वयं आलासि आमुच्या पोटा । आतां चालिजे भक्तीच्या वाटा । गुरु वरिष्ठाचे बोधें ॥ ७० ॥ जनार्दन सांगेल ज्ञान । तें ऐकावें सावधान । जनार्दनाचें वचन । आणुप्रमाण नुलंघी ॥ ७१ ॥ जनार्दन तुझी माता । जनार्दन तुझा पिता । जनार्दन तुझा भ्राता । स्वामी तत्वता जनार्दन ॥ ७२ ॥ जनार्दन तुझा गुरु । जनार्दन तुझा सहोदरु । जनार्दन तुझा निर्धारु । सार विचारु जनार्दन ॥ ७३ ॥ जनार्दन तुझें मन । जनार्दन तुझें साधन । जनार्दन तुझें ध्यान । विज्ञान जनार्दन ॥ ७४ ॥ जनार्दनावाचोनि आणिक । दुसरा नाहीं तारक । तयासि शरण जातां देख । परम सुख पावसी ॥ ७५ ॥ ऐसें वडिलाचें वचन । येका ऐकोनी सावधान । मग घातलें लोटांगण । मस्तकीं चरण

१ मूठभर, ल्हान असा आशय.

वंदिलें ॥ ७६ ॥ म्हणे स्वामींचें वचन । आतां नुलंघवे जाण। तुमचें वचन तें प्रमाण । जाईन शरण जनार्दना ॥ ७७ ॥ आत्मा हृदयस्थ जनार्दन । तो अंतरीं असे परिपूर्ण । तो हृदइ धरोनि सावधान । करीन भजन स्वानंदें ॥ ७८ ॥ हृदयीं निर्गुण जनार्दन । बाह्य सगुण जनार्दन । मध्यें घडेल जें भजन । तें ब्रह्म पूर्ण समसाम्यें ॥ ७९ ॥ समसाम्य सर्वांभूतीं । घडल्या जनार्दनाची भक्ती । तें च्यारी मुक्ती शरण येती । कलिकाळ घालिती लोटांगण ॥ ८० ॥ ऐसा भरला प्रेमभर । मग केला नमस्कार । चक्रपाणीस गहिवर । तो अनावर सर्वथा ॥ ८१ ॥ छेदोनि माया पडळ । येका निघाला येक वेळ । माया मोह जाळ । बाधक केवळ परमार्थी ॥८२॥ माया परमार्थी बाधक । माया निजस्वार्थ घातक । माया प्रेम छेदक । मायेनें लोक भ्रमले पै ॥ ८३ ॥ मायेनें वाढविलें अज्ञान । मुळासहित छेदील ज्ञान । मायेनें अंध झाले जन । मी कोण हें स्मरेना ॥ ८४ ॥ मायेनें विकासिलें मन । तेणें संकल्प विकल्प गहन । विषय वासना रजोगुण । खवळला जाण मायेचा ॥ ८५ ॥ अतर्क्य मायेचें महिमान । तेणें दृढ केलें भवबंधन । मायेनें खवळलें जन्ममरण । अनिवार जाण सोडीना ॥ ८६ ॥ ईश्वरी माया अति दुर्धर । मायेनें मोहिले थोर थोर । माया छेदी ऐसा शूर । कोण्ही वीर दिसेना ॥८७॥ कृतार्थ जे साधुसंत । त्यांनीं मायेचा केला घात । माया उडविली निभ्रांत । जेथ जेथ संचरली ॥ ८८ ॥ म्हणोनि

संतांसि कांहीं । जगीं दुसरें उरलें नाहीं । अवघा चिदानंद भरला पाही । ठाईंच्या ठाईं कोंदाटे ॥ ८९ ॥ जगीं जगदीश पहाणें । हे साधूची अतर्क्य खूण । संतची जाणती आपण । इतरांसि जाण अतर्क्य ॥ ९० ॥ जग आणि जगदीश पहाणें । हे त्रिपुटी मावळली जाणें । आपणचि जाले चैतन्यघन । विश्व भरोनि उरले पै ॥ ९१ ॥ हा परम साधू येकनाथ । बाळपणींच विरक्त । न धरुनिया मायेतें । नमन वृद्धांतें करोनि निघे[1] ॥९२॥ आधीं होआवे विरक्त । निरुपद्रव मायारहित । मग भजावा सद्गुरुनाथ । कृपावंत कृपाळु ॥ ९३ ॥ विरक्त जालिया अंतरीं । सद्गुरु कृपा पूर्ण करी । विरक्तीहूनि चराचरी । साधन निर्धारीं असेना ॥ ९४ ॥ आधींच विरक्त पोटांत । त्यावरी चक्रपाणी प्रबोधित । हें ऐकोनि येकनाथ । येकी येकत्वें निघाला ॥ ९५ ॥ न धरुनी दुजियाचा संग । येका जाला निःसंग । धरूनि गुरूचा मार्ग । आला सवेग अमदावती ॥ ९६ ॥ येका आणि जनार्दन । होईल दोघांचें दर्शन । होईल दोघांचें संभाषण । तेंही संपूर्ण अवधारा ॥ ९७ ॥ तुम्ही श्रोते सज्ञान । महाभेदक विचक्षण । हें माझें बोबडें वचन । कृपा करोन ऐकावें ॥ ९८ ॥ जेविं बाळक बोलें बोबडें । तें सर्वत्रांसि आवडे । तेविं मी तुमचें लळीवाडे । तुम्हां पुढें बोलतसे ॥९९॥

---

१ वरील सर्व संवादावरून एकनाथस्वामी आजोबांना सोडून पळून गेले हा प्रचलीत अपवाद खरा नसून त्यांच्या पूर्ण सम्मतीनें किंबहुना आग्रहानें गेले हें सिद्ध होत आहे.

हें प्रतिष्ठान चरित्र थोर । प्रथम प्रतिपदा संवत्सर । नवविध भक्तीच्या निरंतर । गुड्या अपार उभविल्या ॥ १०० ॥ म्हणे कृष्णदास जगदानंद । नंदन श्रीनाथ पदारविंद । सेवोनि चरण मकरंद । सच्चिदानंद स्वयें जाला ॥ १०१ ॥ इति श्री प्रतिष्ठान चरित्रे । प्रथमोध्यायः । संपूर्णः ॥

॥ श्रीउद्धवार्पणमस्तु ॥

## अध्याय २ रा

[ एकनाथस्वामी आमदावतीस ( अहमदनगरास ) येतात—जनार्दनस्वामींचें दर्शन—जनार्दनस्वामी त्यांना छिद्रन पहातात—एकनाथस्वामी त्यांच्या परीक्षेंत उतरतात—एकनाथस्वामींना अनुग्रह—चांदबोध चंद्रशेखरांचें रूपानें दत्तदर्शन—एकनाथस्वामी सेवेसाठीं गुरुगृहीं राहतात ]

श्रीगणाधिपतये नमः ॥ श्रीयेकनाथ कृपाधन । आला अमदावती लागोन । ते कथा अनुसंधान । सावधान अवधारा ॥ १ ॥ देखोनिया आमदा नगर । येका करी नमस्कार । मग प्रवेशला नगर । पुसे घर जनार्दनाचें ॥ २ ॥ तयासि सांगती जन । द्वारीं[1] वसे वृन्दावन । भोवतें तुळसीचें वन । तें स्थान जनार्दनाचें ॥ ३ ॥ तूं शुचिर्भूत परिनिर्मळ । आचारवंत मननसीळ । त्याचें पाहातां राऊळ । म्हणसी केवळ वैकुंठ हें ॥ ४ ॥ ऐशी जन सांगे वार्ता । ऐकोनी संतोष येकनाथा । त्याचे चरणीं ठेवावया माथा । उल्हासता[2] उपरमतु ॥ ५ ॥ केव्हां देखेन जनार्दन । केव्हां मस्तकीं धरीन चरण । केव्हां घालीन लोटांगण । हे आवडी पूर्ण येकनाथा ॥ ६ ॥ व्हावी

१ मुसलमानी राज्यांत हिंदू भगवद्भक्ताचें घर ओळखण्याचें हें गमक वाचून मंडनमिश्रांचें घर शोधावयास निघालेल्या श्रीशंकराचार्यांना धुणीं धुवावयास आलेल्या दायकांनीं मंडनमिश्राच्या घराचीं लक्षणें सांगितलीं, त्याची आठवण झाल्यावांचून रहात नाहीं.

२ उल्हासानें प्रवृत्त झालें.

जनार्दनाची भेटी । हे परम उत्कंठा पोटीं । कराव्या गुह्य गोष्टी । दाटोदाटी अवस्थेची ॥ ७ ॥ लगबगें आला धावोनी । उभा राहिला अंगणीं । तुळसीच्या वृंदावनीं । उभा येवोनि तिष्ठत ॥ ८ ॥ जय जय जनार्दन म्हणोन । गुरू जनार्दनासी केलें नमन । दासी आणि सेवक जन । कौतुक संपूर्ण पाहाती ॥ ९ ॥ म्हणती हा कोण्हाचा मूल । याणें सदना नमन केलें । दुर्बळाचें असेल आलें । सांगू वहिलें जनार्दनासी ॥१०॥ जनार्दनें केलें स्नान । सारिलें संध्या जपध्यान । मग आदरिलें देवतार्चन । तंव सेवक जनें सांगितलें ॥ ११ ॥ नेणो कोण्हा ब्राम्हणाचा मूल । द्वारीं येउनि उभें ठेलें । जनार्दनाचें स्मरण केलें । नमस्कारिलें सदनासी ॥ १२ ॥ सदनासी करोनि नमन । उभा तिष्ठे हात जोडून । ऐकोनि जनार्दन । उठले जाण लगबगा ॥ १३ ॥ येऊनि पाहे जनार्दन । तंव उभा असे कर जोडोन । पाहे सादर निरखून । म्हणे हा कोण कोणाचा ॥१४॥ भावार्थाचा पूतळा । आंगीं ज्ञानाची कळा । भक्तिसुखाचा उमाळा । देखिला डोळां जनार्दन ॥ १५ ॥ देखोनि त्या मुलाचें चिन्ह । जनार्दनासी आनंद पूर्ण । त्याचें ऐकावया वचन । उदित मन जनार्दनाचें ॥ १६ ॥ जनार्दनासी देखोनि दृष्टी । येकनाथासी आनंद कोटी । धाऊनिया उठाउठी । चरणीं मिठी घातली ॥ १७ ॥ मिठी घालूनि उतावेळ । पाद प्रक्षाळिलें प्रेमजळ । आनंदाश्रू श्रवती डोळा । प्रेम उचंबळे अधिकाधिक ॥ १८ ॥ वाढलेनि

प्रेमें संपूर्ण । अधिकाधिक करी नमन । अधिकाधिक नाचे मन । सद्गुरू चरण देखोनि ॥ १९ ॥ देखोनि त्याची प्रेमभक्ती । जनार्दन संतुष्ट जाले चित्तीं । उचलोनिया दोहीं हातीं । अतिप्रीती आलिंगिला ॥ २० ॥ मग पुसे जनार्दन । म्हणे तूं बाबा कोण । कोण तूझें स्थानमान । आम्हां लागून सांगावें ॥ २१ ॥ तूं कोणाचा रे सुत । कां आलासी येथ । तुझा समूळ वृत्तान्त । सांग निश्चित मजलागी ॥ २२ ॥ ऐकोनि जनार्दनाचें वचन । मूळीं आपुलें वर्तमान । सांगता जाला आपण । सावधान अवधारा ॥ २३ ॥ भानुदासाच्या वंशीं देखा । मुळींचा येकला मी येका । तुमच्या पुजाव्या पादुका । शरण देखा मी आलों ॥ २४ ॥ मी उपजल्या जन्मकाळीं । मातापित्याचें लागलों मुळीं । म्हणूनिया तत्काळीं । समूळ गेलीं निजधामा ॥ २५ ॥ वंशावळी पाहातां । पित्याचा जो पिता । दंपत्ययुक्त[1] सर्वथा । आहेति तत्वता प्रतिष्ठानीं ॥२६॥ तीं वृद्धें जालीं बहुत दोघें । तेंही जातील सवेगें । येकला येकत्वें निज आंगें । उरलों चांग जनार्दन ॥ २७ ॥ मागेंपुढें मीचि येका । येकीं येकत्वें मीनलों देखा । आतां भजावा सद्गुरूसखा । ऐसा आवाका धरोनी

---

१ यावरून एकनाथस्वामींच्या सातव्या वर्षापर्यंत आजाआजी पैठणांत क्षेम-कुशल होतीं हें स्पष्ट आहे मात्र तीं फार वृद्ध झालीं असून आपल्या विरहानें झुरतील आणि कदाचित् लवकरच निवर्ततील अशी भीति एकनाथस्वामींना वाटत असावी असें पुढच्या ओव्यांवरून दिसतें

आलो ॥ २८ ॥ आतां तुज आलों शरण । कृपा करावी परिपूर्ण । म्हणोनी साष्टांग नमन । लोटांगण गुरू चरणीं ॥२९॥ हें ऐकोनि जनार्दन । येकनाथासी धिकारी पूर्ण । सांडोनी वृद्ध-दोघेंजण । येथ शरण आलासी ॥ ३० ॥ तुझ्या वियोगें जाण । तात्काळ सांडिती प्राण । जळों जळों तुझें ज्ञान । केवळ अज्ञान जालासी ॥ ३१ ॥ रडतील पडतील क्षिती । भलत्यास येतील काकुलती । काय भ्रंशली तुझी मती । जाई निश्चिती माघारा ॥ ३२ ॥ सांडूनि वृद्धांचें भजन । हृदय केलें परम काठिण । येथें आलासी शरण । तुज मी ज्ञान सांगेन ॥३३॥ जरी तुज पाहिजे गुह्य ज्ञान । चक्रपाणि सांगेल आपण । तो केवळ ज्ञानघन । ब्रह्मसंपन्न महासाधू[१] ॥३४॥ पित्यानें[२] प्रसन्न केला भानू । म्हणोनि पुत्र स्वप्रकाश भानू । आणि ब्रह्मज्ञानाचा निधानू । नेणसी महिमानू तयाचा ॥ ३५ ॥ अलक्षून वडिलांसी । शरण म्हणूनी आलासी । तुज उपदेश करावयासी । पाहिजे आम्हांसी त्याची आज्ञा ॥ ३६ ॥ कठिण हृदयीं गुह्य ठेवणें । हेंची आम्हां लाजिरवाणें । संत हासतील संपूर्ण ।

१ यावरून चक्रपाणि हेही मोठे अधिकारी भगवद्भक्त होते आणि ते व जनार्दनस्वामी एकमेकांना पूर्ण ओळखीत होते, हें स्पष्ट होत आहे.

२ चक्रपाणिचा पिता भानुदास यांना सूर्याचा प्रसाद झाला होता, ही गोष्ट सर्वत्र प्रसिद्ध असून तिला उद्देशून वरील उल्लेख आहे.

कानीं वचन ऐकतां ॥ ३७ ॥ बोळ[1] घातला वांझे । पाषाणीं पेरिलें बीज । तैसें कठिण हृदयीं गुज । ठेवितां लाज सर्वथा ॥ ३८ ॥ हृदय ज्याचें पाषाण । तेथें काय सांगों ज्ञान । सांगितल्या लाभ कोण । वृथा जाण परिश्रम ॥ ३९ ॥ आवगणोनी दोन्हीं वृद्धें । तुवां टाकिलीं प्रसिद्ध । कठिण हृदय परम निषिद्ध । निजात्मबोधें तें नव्हे ॥ ४० ॥ ऐकोनि जनार्दनाचें वचन । येका घाली लोटांगण । म्हणे श्रीगुरु तूमची आण । नाहीं अवगणना म्यां केली ॥ ४१ ॥ नाहीं उलंघिलें वृद्धाचें वचन । नाहीं आलों पलायमान । संतोषें आज्ञा घेऊन । आलों जाण स्वामिया ॥ ४२ ॥ मस्तकीं वंदून त्यांची आज्ञा । मी आलोंजी परमसुज्ञा । वडिलांची अवज्ञा । नाहीं सर्वज्ञा म्यां केली ॥ ४३ ॥ सद्गुरूसी असत्य बोलणें । त्याहूनि वाटे बरें मरण । मरणासी जो आणि मरण । त्यासी असत्य बोलणें लाभ काय ॥ ४४ ॥ असत्य बोलूनि उपदेश घेणें । त्याहूनि पापिष्ट आन कोण । सद्गुरूसी असत्य बोलणें । तो निंद्य जाणें सर्वथा ॥ ४५ ॥ असत्य तेंची निंद्य येक । असत्य तेंचि अघोर नरक । असत्य तेंचि आकल्प दुःख । भोगिती देख

१ वांझेला वाव्हतबोळ खावयास दिल्यानें ज्याप्रमाणें तिला दूध सुटणार नाहीं, किंवा दगडांत पेरलेलें बीं उगवणार नाहीं, त्याप्रमाणें तुझ्यासारख्या कठोर मनाच्या मनुष्याला ब्रह्मज्ञानाचें गुह्य सांगितलें तरी तें फलद्रूप होणार नाहीं, असा जनार्दनस्वामींचा आशय.

अनिवार ॥ ४६ ॥ सत्य विश्वीं विश्वंभर । सत्य परब्रह्म साचार । सत्यापरतें परमार्थ सार । नाहीं साचार तीहीं लोकीं ॥ ४७ ॥ असत्य तोचि परम अविवेक । सत्य तेंचि सुखदायक । सत्य धर्माचा सधर्म देख । सत्यचि देख संत जाहले ॥ ४८ ॥ वृद्धाची आज्ञा वंदूनि माथा । मी आलोजी सद्गुरूनाथा । हे त्रिसत्य वाक्य सर्वथा । कृपावंत स्वामिया ॥ ४९ ॥ तुम्हां वाचोनि सद्गुरूनाथ । दुसरा न पाहे जगांत । हें वाक्य माझें ब्रह्मलिखित । जाण निश्चीत स्वामिया ॥ ५० ॥ जनीं भजावा जनार्दन । हा अनुग्रहो दयाळा पूर्ण । म्हणोनि घाली लोटांगण । धरिले चरण न सोडी ॥ ५१ ॥ सर्वस्वें तुमचा विकिलों । सर्वस्वें तुमचा अंकिलों । कृपाहस्तें माखिलों । आनंदें पोखिलों सर्व भूतीं ॥ ५२ ॥ सर्व भूतीं देखणी स्थिती । मज द्यावी जी कृपामूर्ति । वाढ्य सद्गुरूची भक्ती । तेही निश्चिती मज द्यावी ॥ ५३ ॥ तुमचे कृपेचा बडिवार । भजनीं भजे विश्वाकार । हा वर मज द्यावा साचार । निज निर्धार स्वामिया ॥ ५४ ॥ म्हणऊन घातलें लोटांगण । मस्तकीं वंदिले दोनी चरण । नेत्रीं हृदयीं आलिंगन । दिधलें जाण चरणासी ॥ ५५ ॥ वारंवार वंदी चरण । सर्वेचि करी प्रदक्षिण । गुरुभजनीं अवंचक जाण । हें जनार्दना कळों सरलें ॥ ५६ ॥ हा सर्वभावें अवंचक । सर्वभावें विश्वासक । हे जनार्दनासी आवश्यक । कळलें देख सुचिन्ह ॥ ५७ ॥ पित्राज्ञेनें आला शरण । त्यासि अभय द्यावें पूर्ण । विलंब न करावा अर्धक्षण ।

आजिचा दिन सुखाचा ॥ ५८ ॥ आजि सुखाचा सुदिन । जालें सत्सिष्याचें दरुषण । त्याचें ऐकोनि परमार्थ वचन । समाधान जनार्दना ॥ ५९ ॥ मग सकला सांगे जनार्दन । अवघे तुम्ही करा भोजन । आजि जालिया अस्तमान । निसीं भोजन आम्हीं सारूं ॥ ६० ॥ सकळासि आज्ञा दिली भोजनी । मग येकनाथासी घेवोनी । तुळसी वनीं वृंदावनीं । येकांतस्थानी बैसला ॥ ६१ ॥ येका आणि जनार्दन । येक जाले आनंदघन । साक्षी तुलसी वृंदावन । जेथें श्रीकृष्ण सर्वदा ॥ ६२ ॥ श्रीकृष्णाचें येकांतस्थान । तें तुलसीचें वृंदावन । तेथें बैसोनि जनार्दन । गुह्य ज्ञान प्रबोधी ॥ ६३ ॥ येका येकत्वें परिपूर्ण । जनार्दन कृष्ण अभिन्न । नाहीं दुजयाचें भान । ब्रह्म परिपूर्ण पूर्णत्वें ॥ ६४ ॥ त्या पूर्णत्वठायीं जाण । येका प्रबोधी जनार्दन । कृष्ण उपासना[1] गुह्य ज्ञान । कानीं सपूर्ण सांगितलें ॥ ६५ ॥ जो बोधिला अतर्क्य बोधू । तो बोध जाणती सत साधु । जेथूनि परतले वेदू । तोचि बोधु बोधला ॥ ६६ ॥ येकनाथासी करिता बोध । तव आला चांदबोध[2] । चंद्रशेखर महासाधू । अवतार प्रसिद्ध दत्तात्रयाचा ॥ ६७ ॥ तो सप्त ताड उंची

---

१ यावरून एकनाथस्वामींना श्रीकृष्णाची उपासना मिळाल्याचें स्पष्ट होत आहे

२ चांदबोध चंद्रशेखर या नावाचे दत्तानंतर म्हासाधू या गुरुशिष्यांच्यीं पहिल्या भेटींत दर्शन द्यावयास आले जनार्दनस्वामींनीं एकनाथस्वामींना दत्त-दर्शन करविलें अशी जी प्रसिद्धी आहे, तिची उपपत्ति यावरून लागते.

गहन । अवचिता देखिला जनार्दन । सर्वेचि होवोनि हास्यमान । आला संपूर्ण ते स्थानीं ॥ ६८ ॥ समागमें असती दोनी श्वान । ते प्रत्यक्ष कामधेनू जाण । जेथें बैसला जनार्दन । तेंचि स्थान ठाकिलें ॥ ६९ ॥ देखोनि सद्गुरू चंद्रशेखर । जनार्दनें केला नमस्कार । वृत्तान्त जाणविला समग्र । मग चंद्रशेखर संतोपला ॥ ७० ॥ चंद्रशेखरें तांबोल चघळुनी । घातला येकनाथाच्या वदनीं । म्हणे वाचाल[1] होसी ब्रह्मज्ञानीं । ऐसें सांगूनि अदृश्य जाले ॥ ७१ ॥ जनार्दनें केलें साष्टांग नमन । मग येकनाथासी सांगे आपण । हे आम्हुचे स्वामी संपूर्ण । देउनी दर्शन अदृश्य जाले ॥ ७२ ॥ तूझें आजि सफळ ज्ञान । दरशन दिधलें स्वामीनें । संतोप होउनि जनार्दनें । दिधलें अलिंगन येकनाथा ॥ ७३ ॥ कृष्ण उपासना पडतां कानीं । येका पालटला तत्क्षणीं । जनीं वनीं विजनीं । नीरंजनीं कृष्ण दिसे ॥ ७४ ॥ कृष्णनाम बीजाक्षर । तीं क्षरातीत पर । चिन्मात्रैक निरंतर । अति उदार पूर्वस्व ॥ ७५ ॥ गुरुकृपेचें अंजन । येका लेईला आपण । सर्वभुतीं श्रीकृष्ण । निश्चयें पूर्ण देखिला ॥ ७६ ॥ कानीं ऐकोनि गुह्य गुज । येकनाथासी आली नीज । सर्वभूतीं अधोक्षज । सहजीं सहज देखत ॥ ७७ ॥ जनार्दन कृपावचन । येका आनंदला स्वानंदघन । मग वंदूनी सद्गुरुचरण । लोटांगण

१ हा आशीर्वाद एकनाथस्वामींच्या बाबतींत पूर्ण सिद्ध झाला, याची साक्ष त्यांची प्रासादिक ग्रंथसंपत्तीच देत आहे.

घातलें ॥ ७८ ॥ भावें घालितां लोटांगण । जनार्दनें आलिंगिला जाण । तेणें सर्वांग जालें पावन । स्वानंदपूर्ण सुखबोध ॥ ७९ ॥ येका पावला पूर्ण ज्ञान । आतां करील गुरुभक्ती पूर्ण । गुरुभक्तीचें महिमान । अगम्य जाण तिहीं लोकीं ॥ ८० ॥ गुरुभक्तिलागी श्रीहरी । काष्टभारे वाहे शिरीं । संदीपनाचे घरीं । हें चराचरीं जाणिजे ॥ ८१ ॥ नुलंघवे गुरूचें वचन । सवे अर्जुनासी घेउन । रथारूढ होवोनि जाण । गेले श्रीकृष्ण क्षीरसागरा ॥८२॥ तेथें शेषशयनीं नारायण । सहज निजेल आपण । देखोनिया कृष्णार्जुन । विस्मितपूर्ण लक्ष तयाच्या ॥ ८३ ॥ श्रीकृष्ण आणि नारायण । दोघा पडिलें आलिंगन । त्या आलिंगनाचें महिमान । लक्ष पूर्ण लक्षेना ॥ ८४ ॥ कृष्ण म्हणे नारायणासी । गुरुपुत्र आहेति तुजपासी । यमानें आणिले निश्चियेसीं । ते मजपासी देई पां ॥ ८५ ॥ ऐकोनि श्रीकृष्णाचें वचन । संतोषला नारायण । गुरुपुत्र आणिले यमानें । ते कृष्णासि जाण दीधले ॥ ८६॥ श्रीकृष्ण घेउनी गुरुपुत्रासी । रथारूढ अर्जुनासी । नमस्कारूनिया नारायणासी । गुरुगृहासी पैं आला ॥ ८७ ॥ गुरूचे पुत्र गुरूसी । अर्पण करी हृषीकेशी । नमस्कारितां चरणासी । येरें पोटासी धरियला ॥ ८८ ॥ पाळूनि आयुच्या वंशाते । पूर्ण केले मनोरथ । यमाने नेले सुत । आणूनि निश्चित मज दिधले ॥ ८९ ॥ म्हणवोनि तुझा उपकार । कृष्णा जाला अपार ।

कृष्ण म्हणे मी किंकर । आज्ञाधर पैं तुमचा ॥ ९० ॥ मग वंदूनी गुरुसी । कृष्ण आला द्वारकेसी । गुरुभजनाची प्रीति ऐसी । श्रीकृष्णासी लागली ॥ ९१ ॥ अंतरीं असावें संपूर्ण ज्ञान । बाह्य असावें नेणपण । तरीच गुरुभक्ति घडेल जाण । हें कळलें संपूर्ण येकनाथा ॥ ९२ ॥ घ्यावा भक्तिसुखाचा लाहो । हा येकनाथासी परम उत्सावो । मग जनार्दन येका स्वयमेवो । आले पाहो गृहासी ॥९३॥ निशीकाळीं प्रहर येका । दोघे पंक्ति बैसोनि देखा । भक्ष्य भोज्य षड्रसादिका । भोजन देखा सारिलें ॥ ९४ ॥ जे सद्गुरू पंक्ती जेविले । ते जन्ममरणा आंचवले । काय महिमा बोलूं बोले । धन्य केवल गुरुभक्त ॥ ९५ ॥ शय्या घालोनि येकांतीं । स्वयें बैसविलें गुरुमूर्ती । येकनाथ विडा देतसे हातीं । प्रेमभक्ती उल्हास ॥ ९६ ॥ फळाशा[1] पोडून फोडी । परिपक्व शांतीची विडी । येका देतसे आवडी । जाणती गोडी जनार्दन ॥ ९७ ॥ आतां येकनाथ करी गुरुभक्ती । तें परिसावें तुम्ही श्रोतीं । कृपा करावी साधुसंतीं । हे विनंति दीनाची ॥९८॥ तुम्ही संत परम कृपाळु । दीनाचाही दयाळु । स्नेहासी स्नेहाळु । परम मवाळु मनाचे ॥९९॥ तुमची जालिया

---

१ पोफळ म्हणजे सुपारी त्यातला पो काढून जें फळ शिल्लक राहतें त्याची आशा सोडून म्हणजे त्याचें चूर्ण करून परिपक्व शांति समाधानाचा विडा एकनाथस्वामी आपल्या गुरूंना देते झाले, अशी कोटी करण्याचा लेखकाचा हेतु दिसतो.

कृपादृष्टी । सरस्वती वदेल वाक्पुटीं । मलत्या केलिया वाचाळ[1] गोष्टी । पडेल मिठी स्वानंदाची ॥१००॥ आतां गुरुभक्तीचें लक्षण । येका दावील आपण । मन करोनि सावधान । कथा निरूपण अवधारा ॥ १०१ ॥ हें प्रतिष्ठान चरित्र बीज । भावभक्तीचा सोहळा सहज । भक्ति बहिर्णीनें पूर्ण तेज । सद्भाव सहज श्रृंगारिला ॥ १०२ ॥ म्हणे कृष्णदास जगदानंद । नंदन श्रीनाथ पदारविंद । सेवोनि चरण मकरंद । सच्चिदानंद स्वयें जाला ॥ १०३ ॥ इतिश्री प्रतिष्ठान चरित्रे । गुरूपदेश माहिमा वर्णनो नाम द्वितीयोध्यायः ॥ संपूर्णोस्तु ॥ २ ॥

॥ श्रीउद्धवार्पणमस्तु ॥

---

१ तुमची कृपा झाल्यावर मी काहींही वटवटत गेलों तरी तें तुम्हाला आनंददायकच होईल, असा आशय.

## अध्याय ३ रा

[ एकनाथस्वामींची दिनचर्या—ब्राह्ममुहूर्तीं उठणें—त्यांचें व गुरूंचें भस्म-स्नान—गुरूंच्या प्रातर्विधीची सिद्धता—दरबारास जाणें—गुरूंचें दप्तर सांभाळणें—दप्तराची माहिती स्वतः काढणें—दरबारांतून परत आल्यावर गुरूंच्या स्नानाची तयारी—पूजेची सिद्धता करून देणें—गुरूंचें भोजन झाल्यावर उच्छिष्ट प्रसाद सेवन—त्यासंबंधीं सद्गुरूंनीं लोकद्वय्या घेतलेला आक्षेप—एकनाथस्वामींनीं दिलेलें समर्पक उत्तर—जनार्दनस्वामींचा पूर्ण संतोष. ]

श्रीरामचंद्रार्पणमस्तु । श्रीयेकनाथायनमः ॥ येका करील गुरूची भक्ती । तें सादर परिसावें श्रोतीं । अवधान द्यावें संतीं । म्हणवूनी विनंती पैं केली ॥ १ ॥ येकनाथासी नित्य नेम । गुरुभजनीं आधिक प्रेम । नुलंघी आज्ञेची सीम । हा स्वधर्म भक्तीचा ॥ २ ॥ ब्राह्ममूहूर्तीं उठोन । मलमूत्र क्षाळून । भस्मस्नान करून । गुरुभजन नित्य करी ॥ ३ ॥ भस्मस्नान पैं थोर । रोमाद्रोमलिंगाकार । शिवालय तेंचि शरीर । माहिमा अपार भस्माचा ॥ ४ ॥ आपाद मस्तक पर्यंत । भस्म सर्वांगीं उधळत । तो ईश्वराचि मूर्तिमंत । ऐशा भस्मांत जो साधि ॥ ५ ॥ भस्मस्नान साधिल्यावरी । कळिकाळ पळे दुरीच्या दुरी । हे भस्माचि अगाध थोरी । जाला अधिकारी येकनाथ ॥ ६ ॥ भस्मस्नान करून । गायत्री मंत्र जपोन । चोवीस नामें स्मरून । लोटांगण गुरूसी घाली ॥ ७ ॥ दीर्घदंड लोटांगण । स्वयें नामिला जनार्दन । सांनिध वैसोनि जाण । करी गायन कीर्तनाचें ॥ ८ ॥ प्रातःकालींच चारित्र । नानापरींचें विचित्र । अष्टक भूपाळी

स्तुतिस्तोत्र। भोक्ता स्वतंत्र जनार्दन ॥ ९ ॥ हरी चरित्र पुष्पावली । अर्पी जनार्दन मौळीं । सद्गुरूस प्रातःकाळीं । पुष्पांजुळी अर्पिली ॥ १० ॥ शय्या झाडोन ठेविली जाण । अंगणीं पातले जनार्दन । येका ठेला सावधान । तिष्ठत आपण उभा असे ॥ ११ ॥ पात्रीं भरोन जीवन । येकनाथ देतसे आपण । जेव्हां मागतील जनार्दन । तेव्हांचि जाण देतसे ॥१२॥ बहिरभूमीस गेले गुरुनाथ । म्हणोनि उष्णोदक आणि तस्त । सिद्ध करोनि बैसे हात । वाट पाहत श्रीगुरूची ॥ १३ ॥ आणोन ठेवी मृत्तिका । दंतधावना लवण देखा । आचमना पाहिजे सीतोदका । तेही येका आणूनि ठेवी ॥ १४ ॥ सद्गुरूस भस्म लेपन । तेंही सिद्ध करी आपण । जरी मागतील चंदन । उगाळून स्वयें ठेवितो ॥ १५ ॥ आले देखोनि जनार्दन । बैसका[१] ठेविली संपूर्ण । त्यावरी बैसोनि आपण । मुख प्रक्षाळण मांडिलें ॥ १६ ॥ सद्गुरूचे श्रीचरण । ते तत्वता ब्रह्म पूर्ण । येका प्राक्षाळी आपण । सद्भावें जाण स्वानंदें ॥ १७ ॥ स्वामी करितील मुख प्रक्षाळण । येका तस्त पुढें ठेवी आपण । स्वामीचा उगाळ[२] संपूर्ण । बाहेरी जाण जाऊं नेदी ॥ १८ ॥ सहज आहे चरणोदक । आणखी प्रक्षाळिजे श्रीमुख । स्वामीचे स्वेद कफ लाळ थुंक । सेवीन निःशंक मी येका ॥ १९ ॥ जालें मुखप्रक्षाळण । मग केलें

१ पाट.
२ स्वामीच्या आंगावरून पडणारा घाम, चूळ, पायाचें पाणी वगैरे.

भस्मलेपन । अर्पोनिया चंदन । करी नमन गुरूसी ॥ २० ॥ तस्तामाजील पाणी । स्पर्श करतील कोणी । आड जाउनी वृंदावनीं । घडघडोनि सेविलें ॥ २१ ॥ लाळ थुंका कफ पित्त । उदकीं समरसलें होतें । गुरुप्रसाद म्हणऊनी तेथें । येका प्राशीत स्वानंदें ॥ २२ ॥ मग उठोन जनार्दन । आणविलें सुखासन । होऊनि सुखासनीं आरोहण । चालिले जाण दरबारा ॥ २३ ॥ समागमें येकनाथ । दप्तर घेऊनिया हातें । जनार्दना सांघातें । चरण चाली जातसे ॥ २४ ॥ सांगतील गुरू । सेवेसि होय अति तत्परु । सोडोनी बैसला दप्तरु । जवळि सादरू जनार्दनाच्या ॥ २५ ॥ जें लिही म्हणती जनार्दन । तें लिहून दावी आपण । पत्र वाचणें अथवा लिहिणें । तदाज्ञेनें वर्ततो ॥ २६ ॥ सर्व काढोनि धुरंग झाडा । बाकी मात सकुळ वर्गापुढा । रुका अडका अथवा कवडा । बाकीचा निवाडा येका करी ॥ २७ ॥ मांडली जमाखर्च मांडणी । दाविली अमल समजावणी । हे जनार्दन देखोनी । अंतःकरणीं सुखावलें ॥ २८ ॥ सदरेसी बैसले येक प्रहर । उरकिला तेथील कारभार । स्नानसंध्ये लागे उशीर । उठिलें सत्वर जनार्दन ॥ २९ ॥ बैसोनी चालले सुखासनी । वाखाणिजे वंदीजनीं । येका स्वामि सन्निधानीं । सावधपणीं चालतसे ॥ ३० ॥ आले जनार्दन मंदिरासी । येका सादर सेवेसी । उष्णोदक पात्रासी । भरुनि स्नानासी देतसे ॥ ३१ ॥ स्नान सारिती जनार्दन । येका सिद्ध करी

आपण । संध्या पात्रीं भरिलें जीवन । भस्म आणून ठेविलें ॥ ३२ ॥ ब्रह्मयज्ञ तिल तर्पण । सिद्ध साहित्य ठेवी आपण । अर्घोदक भरोनि पूर्ण । ठेविले जाण गुरुपाशीं ॥३३॥ गंधाक्षता कुंकुमयुक्त । सिद्ध करोनि स्वयें देत । अभिषेककालीं स्वरयुक्त । सूक्त बोलत पैं येका ॥ ३४ ॥ तुळसीयुक्त पत्र पुष्प । आणुन ठेवी गुरुसमीप । देवासि अर्पितांची धूप । सवेंचि दीप सिद्ध करी ॥ ३५ ॥ देवासि अर्पितांची येकारती । येका नैवेद्य सिद्ध करी हातीं । खाद्य शर्करा घृतिं । नैवेद्य अर्पिति स्वानंदें ॥ ३६ ॥ महानैवेद्य जो सांग । तोही अर्पिती सवेग । निरांजन दीप चांग । तोही निर्वेग अर्पिला ॥ ३७ ॥ टाळ घोळ मृदंग भेरी । विणा वेणू नाना कुसरी । आरत्या अर्पिती श्रीहरी । अतिगजरी उल्हास ॥ ३८ ॥ आरतीचेनि पडिपाडें । येका नाचे सद्गुरूपुढें । भावार्थाचेनि सुरवाडें । वाडें कोडें नाचतु ॥ ३९ ॥ आरती जालियावरी । मंत्रपुष्प द्विजवरीं । अर्पोनिया श्रीहरी । नमस्कारीं विनटलें ॥ ४० ॥ अवघे वारंवार करिती नमन । येका अखंड दंडायमान । अनन्य भावें भक्तिपूर्ण । नाटोपे जाण कोणासी ॥ ४१ ॥ आतां पूजावें द्विजा । येका विधियुक्त करी पूजा । पूज्य पूजक नाठवोनी द्विजा । येकत्वें पूजा येकनाथाची ॥ ४२ ॥ वैश्वदेव आणि बलिहरण । हें संपादिती जनार्दन । ब्राह्मणाचें पूजन । येका आपण संपादी ॥ ४३ ॥ ब्राह्मण पूजेचें कौतुक । येकनाथासी आत्यंतिक । ब्रह्मरूप ब्राह्मण चोख । ब्रह्म भावें हरिखें पूजा

करी ॥ ४४ ॥ जैसे पूजीले ब्राह्मण । तैसाचि पूजिला जनार्दन । धन्य गुरुभक्त परायण । सकळ जन वानिती ॥४५॥ आतां सारांश रोगण । पड्रसादि वाढिती अन्न । ब्राह्मणांसी प्रिय भोजन । उत्तम पक्वान्न घृतयुक्त ॥ ४६ ॥ जनार्दनाच्या घरीं । ब्राह्मण तृप्त निरंतरीं । ग्रासोग्रासी भजावा हरी । हे पद्धति निर्धारी जनार्दनाची ॥ ४७ ॥ ग्रासोग्रासी हरि स्मरण । तो जेविला निराहारी जाण । या स्मरणाचें महिमान । कळले जाण दुर्वासासी ॥ ४८ ॥ साठी खंड्यांचें अन्न । सेऊनि निराहारी आपण । हे हरि ब्रह्म प्रगट पाही पूर्ण । स्वादिष्टपण स्वानंदें ॥ ४९ ॥ अवघीं भोजनें जाहलीं देखा । गुरु उच्छिष्ट इच्छि येका । पाहत असतां सद्गुरू सखा । गोमुखी[1] देखा स्वयें जाला ॥५०॥ लाज सांडोनि सकळिक । येका गोमुखी जाला देख । उच्छिष्ट सेवावया निःशंक । येका येक धाविन्नला ॥ ५१ ॥ भीड सांडोनि सकलिका । गुरु उच्छिष्ट चाटि येका । द्विजासि टक[2] पडिलें देखा । जालें सकलिका चोज ॥ ५२ ॥ उच्छिष्टासहीत पत्रावली । चाटुनी गुरुप्रसाद गिळी । स्त्रिया बोलती तयेवेळीं । याणीं प्रातःकाळीं नवल केलें ॥ ५३ ॥ शेंबूड थुंका मिश्रीत लाळ । मुख प्रक्षाळिले वोंगळ जळ । तस्त नेवोनी येकांत स्थळ । प्राशन केलें पैं याणें ॥ ५४ ॥ हे

---

१ गोमुखी झाला म्हणजे गायमुख झाला. गायमुखांत ज्याप्रमाणें तीर्थ जातें त्याप्रमाणें आपल्या तोंडांत गुरूचें उच्छिष्ट घेता झाला.

२ पंगतीचे ब्राह्मण टकमक पहात राहिले.

जनार्दन ऐकोनि बोल । म्हणे हे भजन अति सखोल । बोलतांचि स्त्रिया थांवल्या सकळ । मौनेंचि उठिले जनार्दन॥५५॥ मग आंचवले सकळिक । करिती तांबोल दक्षिणादिक । द्विज मंत्राक्षता देवोनि देख । गेले सकळिक गृहासी ॥ ५६ ॥ देखोनि येकनाथाची भक्ती । परस्पर आश्चर्य करिती । ऐसी कोणी गुरुभक्ती । नाहीं त्रिजगतीं पैं केली ॥ ५७ ॥ येकनाथें केलें जें जें । जनार्दनासी वाटलें वोझें । यालागीं त्याचे काजें । घ्यावया लाज सर्वथा ॥ ५८ ॥ मागें पुढें न केलें । तें पैं याणें साच दाविलें । गुरुभजनाचें प्रेम भलें । उचंवळें या ठाईं ॥ ५९॥ याचे आंगीं देहभाव नाहीं । म्हणून लाळ थुंका भक्षिलें पाहीं । उच्छिष्ट पात्र लवलाही । समूळ तेंही चाटिलें ॥ ६० ॥ बहूत करावी गुरुभक्ती । म्हणून बोलोंचि बोलती । करोनि दावावयाची शक्ती । नाहीं निश्चिती कोणासी ॥ ६१ ॥ बहूत बोलती बोलें । परि ते निर्वीर्य फल । स्वागें जेणें केलें । तेंचि पावलें श्रीगुरुसी ॥ ६२ ॥ आम्ही परम कुशल आध्यात्मिक । आम्ही सद्गुरूचे थोर मार्मिक । गुरुगृहीं नीच सेवेसी देख । चुकविती निःशंक निजांगें ॥ ६३ ॥ वृथा त्यांचें थोरपण । वृथा त्यांचें शब्दज्ञान । माळा मुद्रा निजभूषण । वृथा जाण मिरविती ॥६४॥ अंतरीं नाहीं आत्मस्थिती । बाह्य न घडेची गुरुभक्ती । दोनी सांडुनी मिरवी स्थिती । ते निश्चिती दांभिक ॥ ६५ ॥ या उदरसंभरण । विषयांध खलचि करिती स्तवन । जळो तयाचे काळें वदन । जे दांभिक ज्ञान मिरवतु ॥ ६६ ॥ हाकनि

दांभिक भजन। विषय इच्छा वाढवी गहन। त्यासी प्राप्त नाहीं ब्रह्मज्ञान। तेथें गुरूचें भजन कैसेंनि घडे ॥ ६७ ॥ ब्रह्मज्ञानाचा पूतळा। येका सोडी भक्तीच्या सळा[1]। तेणें कांप सुटोनी कालिकाळा। दिग्मंडळा लंघिती ॥ ६८ ॥ देखोनि येकनाथाचें भजन। परम संतुष्ट जनार्दन। मग येकनाथातें पाचारून। स्वहित वचन सांगीतलें ॥ ६९ ॥ आजिपर्यंत जें जें केलें। तें तें सर्वथा होऊनी गेलें। आतां सावध होउनी भलें। वर्तलें पाहिजे सर्वथा ॥ ७० ॥ प्रपंचामाजी त्रिविध जन। आन बोलतील आन। लौकीक रक्षोनी भजन। करावें जाणं तत्वतां ॥ ७१ ॥ उच्छिष्टपात्र सावडुनी। स्वयें चाटिसी निःशंकपणीं। आणि पीसी अमंगल पाणी। हे बुद्धी कोणी सांगितली ॥ ७२ ॥ जळो जळो तुझी देहबुद्धी। तुवा टाकिली आपुली शुद्धी। आतां धरोनि सद्‌बुद्धी। वर्तावें त्रिशुद्धी सर्वथा ॥ ७३ ॥ ज्या मार्गी चालती जन। तैसेंचि चालावें आपण। विशेष वाढलिया भजन। निंदास्तवन उद्‌बोधे ॥ ७४ ॥ येका बोले वंदूनि चरण। आम्हां जनासी काय कारण। जनीं येता जनार्दन। अक्षय पूर्ण सुखदाता ॥ ७५ ॥ जनास ज्याचेनि जनपण। तोचि भजावा जनार्दन। हे कळुनीही महिमान। जनाप्रमाण कोण वर्ते ॥ ७६ ॥ जनाप्रमाणें वर्तावें। तरी विषयनिष्टें लागावें। माघारें उलटोनि पडावें। मग भोवावें भ्रमचक्रीं ॥ ७७ ॥

१ सळया, वृष्टी.

जनासी विषय लागले गोड । नाहीं परमार्थाची चाड । विषय ध्यास जाला वाड । अती सदृढ भवमूळ ॥ ७८ ॥ भ्रंशली जनाची मती । मग गुंतली विषयार्थी । आयुष्य गेलें हातोहातीं । हे जनामती कळेना ॥ ७९ ॥ गंगे भरला महापूर । न धरत प्रवाहे येकसरें । तैसें आयुष्य गेलें निर्धारें । मूर्खासि साचार कळेना ॥ ८० ॥ भवार्णवाचे डोहीं । जन सर्व बुडाले पाहीं । जनासी आपुली शुद्धी नाहीं । व्यर्थ अपायीं पैं पडले ॥८१॥ अज्ञानासी भासे जन । येऱ्हवी अवघा जनार्दन । हे निसत्य वाक्य प्रमाण । वेद पुराण वाखाणिजे ॥ ८२ ॥ विश्वव्यापक चैतन्यघन । प्रत्यक्ष तुम्ही जनार्दन । विश्वीं भरोनि आपण । म्हणोनि भजन घडो तुमचें ॥ ८३ ॥ नुरत उरलेंपण । प्रत्यक्ष तुमचे श्रीचरण । येथें जो करील जैसें भजन । तैसें जाण तो पावें ॥ ८४ ॥ हे आम्हां परमार्थ खेळणें । काय जालें जी पूर्णपणें । खेळे खेळ ब्रह्मभुवनीं । सद्गुरूचरणीं निज-बोधें ॥ ८५ ॥ सद्गुरूचे श्रीचरण । तेचि आम्हा ब्रह्मभुवन । म्हणें न निवारा आमुचें भजन । म्हणुन चरण वंदिले ॥ ८६ ॥ चरणीं घातली मिठी । ते न सोडी प्राणसंकटीं । स्वामीनीं करोनि कृपादृष्टी । भजन हातवटी आम्हां द्यावी ॥ ८७ ॥ जंव जंव सद्गुरू भजन घडे । तंव तंव ब्रह्मसुखा पुढे चढे । या भजनाच्या निवाडे । संत सदृढ जाणती ॥ ८८ ॥ जेथें सद्गुरूचें भजन । तेथें संकष्ट संशया होय दहन । मिथ्या भासे मीं तूं पण । तेही जाण उरों नेदी ॥ ८९ ॥ आम्हा

गुरुभजनीं अत्यंत प्रीती । भजन करूं भलत्या रीती । चढती आवडी अत्यंत प्रीती । करूं भक्ती श्रीगुरूची ॥ ९० ॥ सकळामाजि अग्रगणी । सद्गुरुनाथ पूर्णपणीं । म्हणउनी पातला लोटांगणीं । चरणीं लोळणी घातली ॥ ९१ ॥ घातल्या अनन्य लोटांगण । चरणीं देवोनि उड्डाण । तेणे सुखावला जनार्दन । तें सुख जाण बोलतां नये ॥ ९२ ॥ येकनाथाच्या वचनासाठीं । सुख दाटलें सकळ सृष्टीं । तें सुख पावावयासाठीं । सृष्टीच घोटी जनार्दन ॥ ९३ ॥ ते कैसी गिळीली सृष्टी । सृष्टींत व्यापिली निजदृष्टी । भावें पाहातां निजात्म पुष्टी । दृष्टीच घोटी सृष्टीची ॥ ९४ ॥ या अन्वयें पाहतां जाण । अवघा परिपूर्ण जनार्दन । हें येकनाथाचें अंतःकरण । स्वानंदपूर्ण प्रकाशे ॥ ९५ ॥ मनीं विचारी जनार्दन । हा जीवनमुक्त साधू जाण । याचे ऐकतां येक वचन । चिन्मात्रीं मन बुडुनी जाय ॥ ९६ ॥ चिन्मात्रीचें देखणेंपण । प्रत्यक्ष येकनाथ आपण । ऐसें बोलोनि जनार्दन । आलिंगन दीधलें ॥ ९७ ॥ गुरुशिष्या आलिंगन । तेणें जीवशिवा समाधान । दोघांचें दोनपिण । गेलें नियोन सर्वथा ॥ ९८ ॥ येका विराला जनार्दनीं । कीं जनार्दन हारपे येकपणीं । सच्चिदानंद जनीं वनीं । तत्क्षणीं विस्तारला ॥ ९९ ॥ ऐसें येकनाथाचें प्रेम । जगीं पाहतां निरुपम । गुरुप्रेमाचिया महिमे । काय उपमे उपमावे ॥ १०० ॥ हें प्रतिष्ठान चरित्र अक्षया । सकल कुल उद्धाराया । पितरां अक्षयपद पावावया ।

अक्षतृतीया बोलिजे ॥ १०१ ॥ म्हणे कृष्णदास जगदानंद । नंदन श्रीनाथ पदारविंद । सेवोनि चरण मकरंद । सच्चिदानंद होवोनि ठेला ॥ १०२ ॥ इति श्री प्रतिष्ठान चरित्र । गुरुभक्त महिमा वर्णनोनाम । तृतीयोध्यायः ॥ संपूर्णोस्तु ॥ ३ ॥

॥ श्रीउद्धवार्पणमस्तु ॥

# अध्याय ४ था

[ एकनाथस्वामींनीं जनार्दनस्वामींच्या शौचकूपाची केलेली साफसुफी—जनार्दनस्वामींची त्यांच्या निष्ठेविषयीं पूर्ण खात्री—जनार्दनस्वामी एकनाथस्वामींच्या लग्नाचा विचार ठरवितात—वधूच्या शोधाकरितां दौलताबादेस ब्राह्मण पाठवितात—लग्न निश्चिती—चक्रपाणींना निमंत्रण—चक्रपाणींना व एकनाथस्वामींना घेऊन दौलताबादेस प्रयाण—लग्न सोहळा—अहमदनगरास परत येतात—चक्रपाणींना व त्यांच्याबरोबर एकनाथस्वामींना पैठणास जाण्यास निरोप—जनार्दनस्वामींची दौलताबादेस बदली ]

श्रीरामकृष्णाय नमः। पूर्वकथा अनुसंधान। येका आणि जनार्दन। सप्रेम पडितां आलिंगन। समाधान पावले ॥ १ ॥ येके दिनीं आपण। सहजासनीं जनार्दन। बैसले असतां जाण। सेवक जन पाचारिले ॥ २ ॥ तयासी सांगती उतावेळ। बहिर्भूमीचें स्थळ। नरकें भरलें अमंगळ। तें निर्मळ करावें वेगीं ॥ ३ ॥ स्वयें नगरा बाहीर। आहेति ते कुश्चित[1] नर। त्यांसी पाचारूनि सत्वर। अमंगल समग्र भरावें ॥ ४ ॥ स्वामी आज्ञा वंदूनी। सेवक गेले तत्क्षणीं। येकनाथ सावधपणीं। आपुलें मनीं विचार करी ॥ ५ ॥ मनीं विचार करी येका। माझ्या स्वामीचा नरक देखा। आतळों नेदी आणिका। विचार देखा दृढ केला ॥ ६ ॥ माझा स्वामी जो जनार्दन। त्याचें शौचविधीचें स्थळ जाण। तें केवळ अपवित्र स्थान। ऐसें मूर्ख जन जल्पती ॥ ७ ॥ जयें लागले जनार्दन चरण। तें काय म्हणावें अपवित्र स्थान। जेथें जेथें केलें

१ हालालखोर लोक.

गमन । तें तें स्थान पवित्र ॥ ८ ॥ अयोध्येपासोनी लंके-पर्यंत । पवित्र वसुधा सुनिश्चित । हें रामायणीं चरित्र । दाविलें जगातें प्रगट करोनी ॥ ९ ॥ लंका सुवर्णाची केवळ । परि ते अवघीच अमंगळ । असुरी कर्म ग्रांजळ । आचरले केवळ राक्षस ॥ १० ॥ मांस मैथुन सुरापान । गोहत्यादि पातकें जाण । मारुनिया ब्राह्मण । राक्षस आपण भक्षिती ॥ ११ ॥ राक्षसासी मारोनि राक्षस । स्वयें भक्षिती सावकाश । ऐशा अमंगळ स्थळास । चरण आनायासें लागले ॥१२॥ जनार्दनाचे चरण लागल्यावरी । अमंगलासी कैंची उरी । त्या स्थळांतचि उद्धरी । सपरिवारी राक्षस ॥ १३ ॥ कृष्णावतारीं जनार्दन । जेथें जेथें केलें गमन । तें तें स्थळ पवित्र जाण । लागतांची चरण तात्काळीं ॥ १४ ॥ पवित्र गोकुळींची क्षिती । ब्रह्मा वंदी पायाची माती । यशोदा माता चरण वंदिती । अभिनव कीर्ती चरणाची ॥ १५ ॥ कृष्णासि स्वये खेळवितां । चरण चुंबूं जाय माता । तंव पाय धरोनि हातां । ठेवी माथा स्वानंदें ॥ १६ ॥ परम पवित्र जनार्दन । म्हणोनि गोपिका धरिती चरण । अपार चरणाचें महिमान । गोपिका संपूर्ण उद्धरिल्या ॥१७॥ गोपाळास चरणाचा सुकाळ । लाता बुक्याचा गोंधळ । जनार्दनाचे चरण कमळ । गोपी गोपाळ उद्धरले ॥ १८ ॥ पवित्र स्वामींचे चरण । वृंदावनीं तृण जीवन । आणि उद्धरिले पाषाण । थोर महिमान चरणाचें ॥ १९ ॥ नरकासुर दैत्य पूर्ण । नरकीं दडला आपण । त्यासी काढोनी

जनार्दन । केलें उद्धरण तयाचें ॥ २० ॥ अणुरेणू माजी जनार्दन । स्वयें राहिला व्यापून । मूर्ख म्हणती अपवित्र स्थान । अज्ञान जन मतिमंद ॥ २१ ॥ ज्यासि आत्मदृष्टी नाहीं । त्यासि अमंगळ दिसे पाही । पूर्ण दृष्टीच्या ठायीं । समसाम्य पाही सदोदित ॥ २२ ॥ मी जनार्दनाचा पोसणा । पूर्ण दृष्टीचा सुणा[1] । नरकीं न विसंबे जनार्दना । म्हणोनि तत्क्षणा निघाला ॥ २३ ॥ आला शौच आश्रमांत । आश्रम काढोनि ठेविले परते । कुंडांत घालोनि दोन्ही हात । मुखीं म्हणत जनार्दन ॥ २४ ॥ जनार्दन नामाचा टाहो । येका फोडी स्वयमेवो । हात भरिले परियंत बाहो । भरोनि पाहो दुरी टाकी ॥ २५ ॥ पलिता[2] आणें तेथें । परातही येकनाथें । आणिली शुस्र मप भरोनि त्यातें । भिरकावित पैं दुरीं ॥ २६ ॥ स्थळ साणावया लागोनी । विळा पळ्या आणि लाटणीं । खोरी कुदळी आणोनि । तयें स्थानी ठेविली ॥ २७ ॥ दाह्या पाच वरसांचें साचले । येकनाथें अवघें निपटिलें । निपटुनी दुरी भिरकाविलें । निर्मळ केलें स्थळ शुद्धी ॥ २८ ॥ भरोनि टाकितां तेथ । वारंवार स्मरण करित । स्मरणीं जनार्दन प्रगटत । भावार्था अनत भुलला ॥ २९ ॥ स्मरण करितां जनार्दन । तेथें प्रगटला आपण । अमंगळ गेले

---

१ स्वामींची पूर्ण कृपा असलेला कुत्रा.

२ दिवटी, भांडें, परात वगैरे सर्व सदाण, इत्यादि सामान मप म्हणजे काळजी मरून घेऊन एकनाथस्वामींनी दूर टाकून दिलें.

हारपोन । सुगंध चंदन घमघमित ॥ ३० ॥ मघमघीत शुद्ध चंदन । कर्पूर मिश्रित सुगंधपण । येका अनुभवी अवघ्राण । तंव जनार्दन प्रकाशला ॥ ३१ ॥ दुर्गंध सुगंध दोनी जाण । स्वयें करी ब्रह्मार्पण । येक स्वतंत्र आपण । जनार्दन न विसंबे ॥ ३२ ॥ स्थळ शुद्धी केली चांगली । धुवोनी स्वच्छ काढिली । संमार्जनें शुद्ध केली । सुसीळ जालि ते भूमिका ॥ ३३ ॥ शौचास येतील जनार्दन । म्हणवोनि रंग भरला पूर्ण । विखुरला बुका चंदन । सुवास जाण न समाये ॥ ३४ ॥ कुंकुमाची पाउलें जाण । येका काढी आपण । पाउली पाय ठेऊन । श्रीजनार्दन बैसती ॥ ३५ ॥ मंगलामंगल जनार्दन । सकळ मंगलांचें निधान । मंगलमूर्ति श्रीचरण । कुंकुम परिपूर्ण भरतील ॥ ३६ ॥ तंव आले कुथीत जन । सेवके आणिले पाचारून । येऊन पाहती तया जाण । अति विंदाण येणें केलें ॥ ३७ ॥ जनार्दनासी सांगीतलें । म्हणती येकनाथें विचित्र केलें । नरक अवघे भरोनि काढिले । सर्वांग माखिलें तयाचें ॥ ३८ ॥ शुचिर्भूत जाले सारे । नाना कुसरी रंगाकार । स्थळीं रंग भरला अपार । मनोहर पाहताची ॥ ३९ ॥ ऐकुनी कुथिताचें वचन । जनार्दन धाविन्नले आपण । नरनारी अवघे जण । पाहावया धाविन्नले ॥ ४० ॥ करोनिया त्वरा मोठी । जनार्दन धाविन्नले उठाउठी । येकनाथातें देखोन दृष्टि । लल्लाट पिटी पैं हातें ॥ ४१ ॥ नरनारी समस्त पाहती । विस्मित होवोनि राहती । मग जनार्दनें

धरोनि हातीं । नेला निश्चिती गृहासी ॥ ४२ ॥ मग मिळोनिया समस्त । उष्णोदक आणिलें तप्त । जनार्दनें आपुल्या हातें । येकनाथातें न्हाणिलें ॥ ४३ ॥ अंग मर्दोनि संपूर्ण । केलें सर्वांग क्षाळण । येका निर्मळ जाला जाण । सबाह्य आपण उजळला ॥ ४४ ॥ सबाह्य उजळला पूर्ण । जनार्दन तुष्टला आनंदघन । क्षेम दिधलें संपूर्ण । येक क्षण हृदयीं धरिला ॥४५॥ मनीं विचारी जनार्दन । करावें येकनाथाचें लग्न । मग दंपत्ययुक्त[1] दोघेंजण । बोलवावीं जाण प्रतिष्ठाना ॥ ४६ ॥ आता या पासोनी सेवा घेणें । हेंचि आम्हां लाजिरवाणें । हा पावला पूर्णत्व खूण । म्हणोनि निःशंक भक्तीसी ॥ ४७ ॥ याणे वोळखिला आत्माराम । म्हणोनि दाटलें गुरुप्रेम । गुरुभक्ती करी निःसीम । अति संभ्रमें स्वानंदें ॥ ४८ ॥ जव नाहीं आत्मप्रचीति । मग कैसेनि घडेल गुरुभक्ती । येकनाथ भाविक मूर्ती । घडली भक्ती श्रीगुरूची ॥ ४९ ॥ आता लग्नाचा विचार । स्वयें करावा साचार । जनार्दन होवोनी सादर । विप्रातें सत्वर पाचारिलें ॥ ५० ॥ विप्रासि म्हणे जनार्दन । न्हावें येकनाथाचें लग्न । हे चित्तीं धरोनि स्वामींनें । वधूचें शोधन करावें ॥ ५१ ॥ असो दुर्बल अथवा समर्थ । वधूसि कारण निश्चित । स्वामींनें काया वाचा चित्तें । स्वयें वधूतें

१ एकनाथस्वामींच्या लग्नाला चक्रपाणि आणि त्यांच्या पत्नी यांना बोलविण्याचा जनार्दनस्वामींनीं विचार केला आणि तीं दोघेजणें प्रत्यक्ष आलीं असल्याचा उल्लेखही पुढें आला आहे. एकनाथस्वामींचें लग्न घरीं परत आल्यावर आजा-आजींनी केलें असा सर्व चरित्रकारांनीं केलेला उल्लेख चुकीचा असून तें जनार्दनस्वामींनींच केलें हें या चरित्रावरून सिद्ध होत आहे.

शोधावें ॥ ५२ ॥ ऐकोनि जनार्दन वाणी । विप्र निघाला तत्-क्षणीं । वधूचा सिद्धांत करोनी । पाचवे दिनीं तो आला ॥ ५३ ॥ दौलताबाद नगर । तेथें त्रिविक्रम[1] ब्राह्मण शास्त्री थोर । तत्कन्येचा करोनि निर्धार । द्विज सत्वर परतला ॥ ५४ ॥ म्हणे अपार करा सामग्री । साहित्य करा नाना कुसरी । परवडी[2] करा अनेक परी । सकल सोयरी संतुष्ट करूं ॥ ५५ ॥ मूळ धाडीत प्रतिष्ठानास । गौरवूनि आणिलें भानूसुतास । इष्ट मैत्र सर्वत्रांस । अति उल्हासें पाचारिलें ॥ ५६ ॥ अति संभ्रमें गजर । चक्रपाणि आला प्रेमभर । मग जनार्दन आला सामोर । अती गजरे स्वानंदें ॥ ५७ ॥ चक्रपाणि जनार्दन । येकमेका साष्टांग नमन । येकमेका आलिंगन । स्वानंद घन उल्हासे ॥ ५८ ॥ दोघांच्या नमनासाठीं । चौवाचेसि पडिली मिठी । प्रेम न साठेचि पोटीं । तें स्वानंदें दृष्टी प्रव्हाहे ॥ ५९ ॥ प्रेम अवस्था जिरवोनी पोटीं । दोघांनीं उघडिल्या दृष्टी । सप्रेम अति संतुष्टी । जाल्या भेटी दोघांच्या ॥ ६० ॥ येका वंदी चक्रपाणीचे चरण । येरी पोटासी धरिला अपंगून । नयनीं गहिंवरला पूर्ण । तें जनार्दनें निवारिलें ॥ ६१ ॥ आश्वासूनि चक्रपाणिसी । जना-

---

१ एकनाथस्वामींची पत्नी विजापूरची होती अशी अदाजानें अलीकडील चरित्रकारांनीं दिलेली माहिती चुकीची आहे. दौलताबाद येथील राहणारे त्रिविक्रम शास्त्री यांची ही कन्या होती, हें आतां स्पष्ट झालेंच आहे.

२ लयलूट, रगाडी.

र्दनें सांगितलें तयासी । विवाह जालिया येकनाथासी । प्रतिष्ठानासी घेवोनि जावें ॥ ६२ ॥ याच्या भजनीं निश्चित । पूर्ण आमुचें मनोरथ । त्याचेंही मनोगत । सद्गुरुनाथ पुरवील ॥ ६३ ॥ चक्रपाणिस घेवोनि आले । सकळ नगरीं प्रवेशलें । येरे दिवशीं लग्न चालिलें । सिनिकें चाहिलें वरासी ॥ ६४ ॥ वस्त्र अलंकार भूषण । येका शृंगारिला जनार्दनें । अति संभ्रमें करोन । चालिले संपूर्ण लग्नासी ॥ ६५ ॥ जेथें वधूचि नगरी । सोइरे आले सामोरी । सर्वां भेटी जालिया। वरी । आले परस्परी आलिंगन ॥ ६६ ॥ सीमंत पूजेचा संभार । आणिला होता अपार । तो वरासी अर्पूनि साचार । चालिले गजरें मंडपा ॥ ६७ ॥ जनार्दनासी जानवसा नगरीं । दिधला मंडप अति कुसरी । तत्दिनीं लग्न नेमिलें रात्रीं । उत्साह करी सानंदें ॥ ६८ ॥ पुण्याहवाचन गणेशपूजन । चक्रपाणिसी बैसवी जनार्दन । मंगलस्नान करून । दंपत्ययुक्त जाण बैसविली ॥ ६९ ॥ जालिया गणेश पूजन । सर्वांचि रुखवत आलें जाण । जालीं सकलांची भोजनें । उल्हासें संपूर्ण सानंदें ॥ ७० ॥ भोजन जालिया नंतर । मूळ आलें न्यावया वर । अनेक वाद्यें अपार । मंडप गजरें दाटला ॥ ७१ ॥ सुखासनीं बैसला येकनाथ । पुढें अनंत वाद्यें वाजत । वऱ्हाड चालिलें मिरवत । सुनिश्चित लग्नासी ॥ ७२ ॥ संभ्रमें आले वधूमंडपासी । इडा पिडा वोवाळिती वरासी । बैसका घालून वरासी । समारंभेंसी

बैसले ॥ ७३ ॥ आतां मधुपर्क विधान । पुरोहित म्हणती सावधान । सकळ मिळोनि द्विजगण । मधुपर्क संपूर्ण आरंभिला ॥ ७४ ॥ दधिमधुमिश्रित सेवन । येका आरंभी आपण । हृदयीं स्मरोनि जनार्दन । स्वयें प्राशन करीतसे ॥ ७५ ॥ सावधान या वचनीं । ब्राह्मण बोलती गर्जोनी । येका शरण जनार्दनीं । अनन्यपणीं सावध ॥ ७६ ॥ सावधान घटिका भरून । बुडावया आली पूर्ण । उशीर नाहीं अणुप्रमाण । करावें स्मरण कुलदेवते ॥ ७७ ॥ येकनाथाचें कुलदैवत । श्रीजनार्दन समर्थ । त्यावाचोनि जगा आंत । दुसरा अर्थ तो नेणें ॥ ७८ ॥ करितां जनार्दन स्मरण । ओं पुण्या हें गार्जेलें वचन । वधूवर अक्षता जाण । अर्पिती संपूर्ण मस्तकीं ॥ ७९ ॥ ब्राह्मण मंत्रोच्चारण । सकळ अक्षता टाकिती पूर्ण । जालिया विधिविधान । करीं कंकण बांधिलें ॥ ८० ॥ येकात्मतेचें कंकण । वधूवरासि बांधिलें पूर्ण । लज्जाहोम करावया जाण । पुरोहित आपण त्वरा करी ॥ ८१ ॥ बहुल्यावरी बैसोनि चांग । होम संपादिला सांग । उषःकाळ जालिया मग । ब्राह्मणभोजन चांग संपादिती ॥ ८२ ॥ ब्रह्मभावें ब्राह्मण भोजन । च्यारी दिवस संपादिलें जाण । चतुर्थ होम संपला पूर्ण । सर्व ब्राह्मण तृप्त केले ॥ ८३ ॥ दक्षिणा दान मान । देऊनि जाय जनार्दन । ब्राह्मण संतुष्ट केले जाण । आशीर्वचन देवोनि गेले ॥ ८४ ॥ व्याही जावाई विहिणी । येकमेका गौरव करोनि । सुखी केल्या वऱ्हाडणी । वस्त्राभरणीं उल्हासें ॥ ८५ ॥ विवाद उत्सव

मंगळ मंगळमूर्ति । मंगलदायक मंगळ कीर्ति । मंगळ प्राप्ति भाविकां ॥ १०५ ॥ म्हणे कृष्णदास जगदानंद । नंदन श्रीनाथ पदारविंद । सेवोनि चरण मकरंद । सच्चिदानंद होवोनि ठेला ॥ १०६ ॥ इति श्री प्रतिष्ठान चरित्रे । चतुर्थोऽध्यायः ॥ संपूर्णोस्तु ॥ ४ ॥

॥ श्रीउद्धवार्पणमस्तु ॥

श्रीएकनाथ महाराजांच्या नित्यपूजनांतील

" श्रीविजयी विठ्ठला"ची मूर्ति ( पैठण )
[ श्रीराई–रखुमाईसह ]




" श्रीविजयी विठ्ठला"ची दिव्य वस्त्रालंकार-विभूषित मूर्ति



मूर्तीच्या खालतीं " दास जेवूं घाल न " अशीं अक्षरें आहेत.

मगळ मंगळमूर्ति । मंगलदायक मंगळ कीर्ति । मंगळ प्राप्ति भानिका ॥ १०५ ॥ म्हणे कृष्णदास जगदानंद । नंदन श्रीनाथ पदारविंद । सेवोनि चरण मकरंद । सच्चिदानंद होवोनि ठेला ॥ १०६ ॥ इति श्री प्रतिष्ठान चरित्रे । चतुर्थोध्यायः ॥ संपूर्णोस्तु ॥ ४ ॥

॥ श्रीउद्धवार्पणमस्तु ॥

श्रीएकनाथ महाराजांच्या नित्यपूजनांतील




" श्रीविजयी विठ्ठला"ची मूर्ति (पैठण)
[ श्रीराई–रखुमाईसह ]



" श्रीविजयी विठ्ठला"ची दिव्य वस्त्रालंकार-
विभूषित मूर्ति

मूर्तीच्या खालतीं " दाम जेवूं घाल न " अशीं अक्षरें आहेत

स्वराज्य गामाची ह भ प यिग सखारामबुवा गामावा मौज कनाळ
संस्थान सांगली याच संग्रही असलेल्या

## श्रीजनार्दनस्वामींच्या पादुका



॥ ओंवी ॥

पादुका माझें निजजीवन । पादुका माझें दैवताचन ।

## अध्याय ५ वा

[ एकनाथस्वामींचे आजे चक्रपाणि यांचा मृत्यू—त्यांच्या पत्नीचें सहगमन—एकनाथस्वामींची पैठण येथील दिनचर्या—दहा घटिकापर्यंत स्नान—गुरुपूजन, नंतर संध्या वैश्वदेवादि नऊ कर्मे—पुढील दहा घटिका भोजन—नंतरच्या दहा घटिका पुराण-श्रवण—रात्रीं दहा घटिका स्नान, पूजन व भोजन—नंतर दहा घटिका कीर्तन—अडीच घटिका झोंप—नंतर ब्रह्मचिंतन. ]

श्रीगणराज प्रसन्न । सद्गुरूंच्या पादुका । स्वयें ठेवोनि मस्तकां । निघता जाला पैं येका । आला देखा प्रतिष्ठाना ॥ १ ॥ भानुसुत आणि येकनाथ । पैठणा आले हर्षयुक्त । दर्शना आले समस्त । सुहृद गोत आप्तवर्ग ॥ २ ॥ येकनाथ सर्वांसी करी नमन । देता जाला आलिंगन । जाले येकनाथाचें ज्ञान । येणें सर्वांसी ॥ ३ ॥ परम कृपाळु जनार्दन । गुरुभजनीं संतोपला जाण । येकनाथासी जाला उत्तीर्ण । करोनि लग्न समारंभ ॥ ४ ॥ ऐसें आपुलाल्या ज्ञान । बोलताती सुहृज्जन । मग आज्ञा घेवोनि निघति जाण । जाती आपण स्वगृहासी ॥ ५ ॥ येका गुरुभक्तपरायण । जरि दूरि राहिला जनार्दन । त्यांच्या चरण पादुका पूजन । करी भजन उल्हासें ॥ ६ ॥ आपुला जो का भावार्थ पूर्ण । तोचि जाणावा जनार्दन । या भजनाचें महिमान । कळलें जाण येकनाथासी ॥ ७ ॥ प्रातःकाली उठोन । गुरु पादुका प्रक्षाळून । तीर्थपात्रीं भरोन । करी स्नान येकनाथ ॥ ८ ॥ गुरु पादोदक प्रसन्न । वृद्धांचें तीर्थ सेवन । अखंड श्रीहरीचें कीर्तन । नामस्मरण गुरूचें ॥ ९ ॥ अंतरीं जडला जनार्दन ।

सबाह्य दिसे परिपूर्ण । हें अगाध भक्ति लक्षण । येका आपण भजन दावी ॥ १० ॥ भानुसुतासी वृद्धापकाळीं । आंगीं संपूर्ण जरा आली । या नंतरें स्वल्प काळीं । दोघे गेले निजधामा ॥ ११ ॥ समागमें[1] गेली कांता । माउली परम पतिव्रता । एवं दोघें गेलीं निजपंथा । ते विधी येकनाथा-करणें घडे ॥ १२ ॥ येकनाथ तो कुलदीपक । करी दोघांचें सार्थक । मीनले स्वजन सुहृद् लोक । नगरीचे आणीक पैं आले ॥ १३ ॥ अवघे मिळोनिया स्वजन । मंत्राग्नि विधान करी ब्राह्मण । एवंच सार्थ करोनि पूर्ण । गेले संपूर्ण स्वाश्रमासी ॥ १४ ॥ पक्ष दिवसामाजि जाण । उरकिलें पिंड प्रदान । देवोनि तिळ तर्पण । मुक्तीस जाण मिरविलीं ॥ १५ ॥ येकनाथाचिये भक्ती । चक्रपाणि पावला मुक्ती । सुपुत्राचेनि पितरास गती । जाणें निश्चिती अनायासें ॥१६॥ येकनाथ तो सत्पुत्र । येकनाथ तो सत्पात्र । येकनाथ तो सत्क्षेत्र । पवीत्र तीहीं लोकीं ॥ १७ ॥ धन्य येकनाथाची स्थिती । धन्य येकनाथाची मती । धन्य येकनाथाची भक्ती । चारी मुक्ती कामरया ॥ १८ ॥ धन्य येकनाथाचें ज्ञान । धन्य येकनाथाचें ध्यान । धन्य येकनाथाचें साधन । साध्य जनार्दन ज्यासि जाला ॥ १९ ॥ धन्य येकनाथाचें कर्म । धन्य येकनाथाचें भजनवर्म । धन्य येकनाथाचा स्वधर्म । स्वयं ब्रह्म तोचि तो ॥ २० ॥ धन्य येकनाथाचा आचार । धन्य

१ यावरून चक्रपाणींच्या पत्नीनें सहगमन केलें असें दिसतें.

येकनाथाचा विचार । धन्य येकनाथ साचार । सारासार विवेक जया ॥ २१ ॥ धन्य धन्य येकनाथाचें यजन । धन्य येकनाथाचें पूजन । धन्य येकनाथाचें भोजन । स्वानंदपूर्ण निज गोडी ॥ २२ ॥ धन्य येकनाथाचें ऐश्वर्य भद्रा । धन्य येकनाथाची निज निद्रा । धन्य त्याची निजात्ममुद्रा । सुख समुद्रा उचंबळे ॥ २३ ॥ धन्य धन्य तें प्रतिष्ठान । धन्य त्याचें अधिष्ठान । धन्य त्याचे अनुष्ठान । जनार्दन सर्वाभूती ॥ २४ ॥ धन्य येकनाथाचें धाम । धन्य येकनाथाचें प्रेम । धन्य येकनाथाचा काम । स्वयें निःकाम सर्वदा ॥ २५ ॥ धन्य येकनाथाची हातवटी । धन्य त्याची मधूर गोठी । धन्य त्याची देखणी दृष्टी । सकळा सृष्टी जनार्दन ॥ २६ ॥ धन्य येकनाथाचें घ्राण । धन्य येकनाथाचें कान । सावधान श्रवणार्थ ॥ २७ ॥ धन्य येकनाथाचें मन । धन्य येकनाथाचें धन । धन्य येकनाथाचें निधान । अनन्य शरण चरणासी ॥ २८ ॥ अनन्य करितां पैं नमन । कृपेनें तुष्टला कृपायन । अभय दीधलें संपूर्ण । पुढील निरूपण विस्तारी ॥ २९ ॥ या कथेसी नाहीं शास्त्राधार । म्हणोनि उपेक्षा करतील नर । तरी साधूचें चरित्र स्वतंत्र । प्रमाण परतंत्र असेना ॥ ३० ॥ हा भक्ति रहस्य प्रत्यय जाण । यासि नलगे प्रमाण । साधु प्रमाणा वेगळे जाण । पूर्णत्व पूर्ण सदोदित ॥ ३१ ॥ येकनाथाची भक्ती चोखडी । उभारिली भक्तीची गुढी । देवासि भक्तीची आवडी । लवड सवडी धाविन्नला ॥ ३२ ॥ प्रेमा भूलला अनंत । म्हणोनि

आला धावत । भक्तिपासीं देव तिष्टत । हे वेदांत प्रमाण ॥३३॥ येकनाथें केलीं गुरुभक्ती । हे वेदीं नाहीं प्रमाणोक्ति । ऐसें कोणी कधीं म्हणती । तेही[1] युक्ती अवधारा ॥ ३४ ॥ वेदाचा वक्ता गुरु जो नारायण । त्यासही न कळे भक्तीचें महिमान । मा वेदासी कैसेनि होइल प्रमाण । आलक्ष जाण श्रुतिशास्त्रा ॥ ३५ ॥ वेदशास्त्र अतर्क्य भक्ती । ते मिरवली येकनाथाचे हातीं । त्या येकनाथाची महंती । कोण्या वचनोक्ती वर्णावी ॥ ३६ ॥ जेथें मौनावले वेद । चारी वाच्या जाल्या स्तब्द । अतर्क्य तर्केना निजबोध । तें स्वरूप शुद्ध येकनाथाचें ॥३७॥ निजबोधाच्या ठायीं । येकनाथ हे हारपले पाही । जे जे संत जाले जे जे ठायीं । ते निजबोध पाही होवोनि ठेले ॥ ३८ ॥ व्यास वाल्मीकादि महामुनी । तेही गेले निजबोध भुवनीं । निवृत्ती ज्ञानेश्वरादि करोनी । निजबोध होवोनि पैं ठेले ॥३९॥ यालागी सर्वथा न कळे पार । संत अनंत आपार । म्हणूनि श्रोतया नमस्कार । करी वारंवार पैं वक्ता ॥४०॥ यालागी साधूची निंदा । कोण्ही न करावी कदा । निंदेची फार आपदा । हे सर्वदा कळले असे ॥४१॥ साधूची करितां छळणा । तात्काळ कुलक्षय जाणा । संत निंदेची कल्पना । जन्म मरणा हे मूळ ॥ ४२ ॥ जेणें निवारे जन्ममरण । ते वंदावे साधूचे चरण । चरण कृपेचें महिमान । अलक्ष पूर्ण लक्षेना ॥ ४३ ॥

---

१ वेदांत गुरुभक्ती सांगितली नाहीं असें जर कोणाचें म्हणणें असेल तर त्याचें समाधान आम्हीं करतों.

साधूचा अगाध महिमा । वर्णू न शके वेद ब्रह्मा । साधूसी द्यावया उपमा । अगम निगमा अतर्क्य ॥ ४४ ॥ ज्ञानेश्वराचा अगाध बोध । प्रत्यक्ष रेडा बोले वेद । हा काय मिथ्या अनुवाद । जग प्रसिद्ध ही कीर्ती ॥ ४५ ॥ भिंति चालविली स्वयमेव । गर्व हत केला चांगदेव । मुक्ताबाईचा अनुभव । भगवद्भाव भूतमात्रीं ॥ ४६ ॥ माहा मुद्गल मुनीचें कठिण तप । मानस पूजेचा करितां जप । मुद्रा देवोनि रक्षिला दीप । जगद्रूप जनार्दन ॥ ४७ ॥ श्रेष्ठ साधू मुकुंदराज । उभारिला विवेकसिंधूचा ध्वज । ते स्वर्ग खालवले सहज । अतर्क्य भोज संताचे ॥ ४८ ॥ प्रत्यक्ष या नामदेव । जेउ घातला स्वयें देव । पांडुरंग जाला सदाशिव । देखोनि भाव नरहरीचा ॥ ४९ ॥ जगप्रसिद्ध तुकावाणी । पांडुरंगीं रंगली वाणी । ज्याचे कागद न भिजती जीवनीं । गेला निघोनि देहासहित ॥ ५० ॥ श्रेष्ठ भक्तीनें सावंता माळी । देव रक्षणार्थ उदर फाली । कवीरानीं अंतकाळीं । पुष्पें केलीं देहाचीं ॥५१॥ ऐसे किती सांगावे संत । संत प्रत्यक्ष अनंत । आदि मध्य नाहीं अंत । स्वयें भगवंत होवोनि ठेले ॥ ५२ ॥ संत केवळ पुरुषोत्तम । संत केवळ निरुपम । संत केवळ आत्माराम । कैवल्य धाम मुमुक्षां ॥ ५३ ॥ हे येकनाथें केली गुरूची भक्ती । हे जग विख्यात जाली कीर्ति । भक्ती सांभाळूनि श्रीपती । वाहे निश्चिती जीवन ॥ ५४ ॥ गुरु प्रेमा आंत । निमग्न जाला येकनाथ । प्रेमाचा भोक्ता कृष्णनाथ । जीवन

नाहत तया घरीं ॥ ५५ ॥ हे पुढें सांगिजेल निरूपण । श्रोतीं व्हावें सावधान । वरें उघडा मनाचे कान । ठसावें ध्यान हरीचें ॥ ५६ ॥ आता येकनाथ करी गुरु भजन । तें ऐकावें सावधान । सांगे जगदानंद नंदन । वंदोनि चरण संतांचे ॥५७॥ भानुसुता देवोनि मुक्ती । येक लागला गुरूचे भक्ती । त्या भक्तीची अभिनव कीर्ति । सुनिश्चिती अवधारा ॥ ५८ ॥ प्रातःकाळी कोणी घरांत । करी साष्टांग प्रणिपात । श्रीजनार्दन समर्थ । आले निश्चित गृहासी ॥ ५९ ॥ सज्जन अथवा दुर्जन । ते न यांसी हे भिन्नपण । दोहीं मध्यें येक जनार्दन । म्हणवोनि घाली लोटांगण तयासी ॥ ६० ॥ अनन्य घाली लोटांगण । मस्तकीं चरण अभिवंदन । अनन्य भावें आलिंगन । करी संपूर्ण चरणासी ॥ ६१ ॥ करोनिया अभिवंदन । बैसावया घाली आसन । मग आणोनिया तस्त जीवन । करी क्षाळण चरणांचे ॥ ६२ ॥ हे आमुच्या स्वामीचे चरण । येणें भावें करी चरण क्षाळण । ते चरण तीर्थ घेऊन । करी स्नान तात्काळीं ॥ ६३ ॥ ज्यासी चरणतीर्थाचें स्नान । त्रिलोकी जाला तो पावन । त्यापासी तीर्थें येऊन । तीर्थें सेवन वांछिती ॥ ६४ ॥ गुरु चरण तीर्थीं जो नाहला । तो सबाह्य अंतरी निवाला । त्रिविध तापे सांडवला । पवित्र जाला तिहीं लोकीं ॥ ६५ ॥ गंधाक्षता तुळसी माळा । अर्पी स्वामीच्या गळा । जोडोनिया करकमळा । उभा ठेला सन्मुख ॥ ६६ ॥ पुढती करी दंडवत ।

जवळी बैसोनि नीश्चित । सुखाववोधें चरित्र गात । गुण वर्णीत हरीचे ॥ ६७ ॥ श्रीहरीचे गुणानुवाद । येकनाथ वर्णी सानंद । राम कृष्ण हरि गोविंद । चरित्र छंद वर्णीतु ॥ ६८ ॥ हातें वाजउनी टाळी । मुखीं अनंत नामावळी । सकळ पातकां करी होळी । ते अर्पी मौळी श्रीगुरूच्या ॥ ६९ ॥ ऐसे त्याचें गुरुप्रेम । ऐसाच चाले नित्यनेम । जनीं जनार्दन निस्सीम । हा भजन संभ्रम तयाचा ॥ ७० ॥ हें प्रातःकाळींचें भजन । दहा घटिका भरिती पूर्ण । तव पर्यंत चरण क्षाळण । करी पूजन संतांचें ॥ ७१ ॥ हे समसाम्य पूजा दहा घडी । लोटल्या स्वकर्माची आवडी । स्नान संध्या स्वधर्म परवडी । दावी उघडी येकनाथ ॥ ७२ ॥ स्नान संध्या आणि जप । स्वाध्याय हरिहर येक रुप । देवतार्चन अमूप । हें पांच रूप कर्माचें ॥ ७३ ॥ सहावें कर्म वैश्वदेव करण । सातवें अतिथीची पूजा जाण । आठवें करी हवन । ब्रह्मयज्ञ पितरांसी ॥ ७४ ॥ हे नऊ कर्में संपूर्ण । चालवी तोचि शुद्ध ब्राह्मण । येऱ्हवी तो शूद्रवत् जाण । ब्रह्मबीज म्हणोनि ब्रह्म कीजे ॥ ७५ ॥ येकनाथ आचरित । नित्यनैमित्तिक सदोदित । हीं नऊ कर्में चालवीत । ते ही अर्पीत जनार्दनीं ॥ ७६ ॥ या नऊ कर्मांचा भोक्ता जाण । स्वधर्म रूपें जनार्दन । भावार्थें अर्पिल्या जाण । कर्मेचि जाण ब्रह्म होय ॥ ७७ ॥ येकनाथाचें गुह्य वर्म । विधियुक्त चालवी कर्म । तेचि ब्रह्मार्पणीं निष्कर्म । कर्मेचि ब्रह्म होऊनि ठाके ॥ ७८ ॥ पंक्ती घेऊनि द्विजगण ।

सेवक आणि ब्राह्मणजन । इष्ट मैत्र सुहृद घेवोन । करी भोजन येकनाथ ॥ ७९ ॥ भोजन सारिल्या जाण । बैसका घालिती संपूर्ण । वीस घड्या भरल्या पूर्ण । पुरोहित आपण सांगती॥८०॥ उरल्या ज्या दहा घटिका । त्या वृथा जाऊं नेदी येका । पाचारोनि पुराणिका । पुराण श्रवण देखा मांडिले ॥ ८१ ॥ काशी खंड काळिका खंड । ऐसीं खंडे आहेति उदंड । अर्थ शोधोनि खंड विखंड । करी प्रचंड येकनाथ ॥ ८२ ॥ भविष्योत्तर भागवत हें श्रवण करी येकनाथ । मत्स्य मार्कंडेय पुराणांत । अर्थ शोधींत पैं येका ॥ ८३ ॥ श्रवणीं ब्रह्मोत्तर खंड । ब्रह्म कैवर्त ब्रह्मांड । वामन पुराण प्रचंड । अर्थारूढ मन होय ॥ ८४ ॥ विष्णुपुराणाचा अर्थ । अनुभवा आणी येकनाथ । वराह पुराण सदोदित । करी येकांत मनासी ॥ ८५ ॥ वायु पुराणाचा अन्वयो । नित्य नूतन सेवी पाहो । वामन पुराणाचा स्वभावो । ज्ञान पाहो तिष्ठत ॥ ८६ ॥ जालिया नारद पुराण श्रवण । मग लिंगपुराण आदरिलें जाण । पद्मपुराणीचा अर्थ गहन । तोही जाण विवंचिला ॥ ८७ ॥ संपविलें पद्मपुराण । मग अग्निपुराण करी श्रवण । त्यानंतर कूर्म पुराण । करी श्रवण येकनाथ ॥ ८८॥ कूर्म पुराणाचेनि श्रवण । येका जाला ज्ञान-संपन्न । संस्कृती[1] रूढलें मन । करतळकमळ ज्ञान

१ एकनाथस्वामींचें संस्कृत अध्ययन मुळींच झालें नव्हतें. पुराणिकांनीं पुराण वाचून अर्थ सांगताना वारंवार श्रवणानें एकनाथस्वामींना संस्कृताची गोडी लागली आणि व्युत्पत्ती कळूं लागली असें म्हणण्याचा आशय.

प्रकाशे ॥ ८९ ॥ मग स्कंद पुराण श्रवण । येका करी आपण । गरूड पुराणाचें महिमान । तेंही जाण आकळिलें ॥ ९० ॥ ऐसी हे अष्टादश पुराणें । येका श्रवणार्थासी सावधान । जव होय अस्तमान । तंव नित्य नूतन संपादिती ॥ ९१ ॥ दिवसा पैं तीस घडीं जाणा । येका आर्पी जनार्दना । रात्रीच्या तीस घड्या जाणा । त्याची विवंचना अवधारा ॥ ९२ ॥ स्नान संध्या पादुकार्चन । करी गुरुपादुका पूजन । निसीकाळीं संपूर्ण । पूजा विधान गुरूसी ॥ ९३ ॥ करितां पादुकांची पूजा । पूज्य–पूजक न दिसे दूजा । येकात्मभावें सहजी सहजा । गुरूची पूजा स्वयें करी ॥ ९४ ॥ दहा घटिकापर्यंत। पादुकार्चनीं निशी लोटित । मग हरिकीर्तन आरंभित । स्वयें बैसत श्रवणासी ॥ ९५ ॥ येकनाथाची पद्धती थोरी । निशी-काळीं हरी गजरीं । हा नेम नित्य निरंतरीं । निज निर्धारीं दृढ निष्ठा ॥ ९६ ॥ वीस घटिका पर्यंत । येका हरिरंगीं डुल्लत । टाळ मृदंग संयुक्त । गात नाचत हरिभक्त ॥ ९७ ॥ पुढें आडीच घटिका सहजें । येकनाथ स्वयें निजीं निजे । नेणों पहुडला समाधि सेजे । ऐसिया नीजे नीजत ॥ ९८ ॥ पुढें शुक्रोदयीं जाण । गुरू भजनीं सावधान । संतीं द्यावें अवधान । पुढील निरूपण अनुपम्य ॥ ९९ ॥ हें प्रतिष्ठान

पंचमी जाणा । नागा अर्पिती अमृतपाना । नाग भूषण नंदी वाहना । हें चरित्र जाणा त्या वंद्य ॥ १०० ॥ म्हणे कृष्णदास जगदानंद । नंदन श्रीनाथ पदारविंद । सेवोनी चरण मकरंद । सच्चिदानंद होवोनि ठेला ॥ १०१ ॥ इति श्री प्रतिष्ठान चरित्र पंचमोध्यायः ॥ संपूर्णोस्तु ॥ ५ ॥

-॥ श्रीउद्धवार्पणमस्तु ॥

[ एकनाथस्वामींचे आत्मसाधन—सर्वांभूतीं भगवद्भावाची प्रचीति—कैकाड्यांची शंभर गाढवें एकनाथस्वामी स्नान करीत असतांना येतात—एकनाथस्वामी त्यांना पाणी पाजतात—महारोगी ब्राह्मण—व्यथेनें कटाळून यात्रेस निघाला असतां पैठणास येतो—त्याला झालेला दृष्टांत—तो एकनाथस्वामींकडे येतो—भागवत श्रवण आणि शंभर गाढवांना जलपान यांतून कोणतें तरी एक पुण्य मागतो—एकनाथस्वामी त्याला भागवत श्रवणाचें पुण्य आणि चरणोदक देतात—ब्राह्मणाची व्यथा नाहींशी होते.]

श्रीसितारामचंद्राय नमः ॥ उगवल्या भृगुनंदन । उरल्या प्रहर निशी जाण । करोनिया भस्मस्नान । घालोनि आसन स्वयें वैसे ॥ १ ॥ घालोनिया दृढ आसन । आत्मारामीं समरसोन । ध्यानीं मुद्रा लाऊन । बैसे संपूर्ण एक प्रहर ॥ २ ॥ साक्षात्कार चैतन्य घन । येका साधी योगसाधन । अष्टांग योग साधुनी पूर्ण । येका येकपण अनुभवी ॥ ३ ॥ हें ब्राह्मी मुहूर्तीचें भजन । येका भजतसे आपण । सर्वेचि गुरुपादुका प्राक्षाळून । सवें स्नान आरंभिलें ॥ ४ ॥ अहो रात्री साठी घडी । लोटिता केली भजन परवडी । येकनाथासी परम आवडी । अभिनव गोडी भजनाची ॥ ५ ॥ नवल भजनाची हातवटी । कळों सरली उठाउठी । भगवद्भावो सकळ सृष्टी । निजात्मदृष्टी देखत ॥ ६ ॥ होवया निजात्म पद प्राप्ती । भगवद्भावो सर्वांभूतीं । हेचि एक श्रेष्ठ भक्ति । आन त्रिजगतीं असेना ॥ ७ ॥ नरदेहा येउनी निश्चिती । जो साधीन म्हणे भगवत्प्राप्ति । त्यासि भगवत्भावो सर्वांभूतीं । श्रेष्ठ भक्ति

नेमिली ॥ ८ ॥ सर्वांभूतीं भगवद्भावो । हा येकनाथाचा भजनोत्सावो । सर्वाधिष्ठानीं एक देवो । हा पूर्ण भावो हृदयींचा ॥ ९ ॥ देव व्यापक सर्वांठायीं । तोचि देव देखिला हृदयीं । जो सर्व भूतांच्या ठायीं । समत्वें पाही सारिखा ॥१०॥ असंख्य घटीं भरलें जळ । त्यांत बिंबलें सूर्य मंडळ । तैसा हृदयस्थ केवळ । विश्व सकळ व्यापिला ॥ ११ ॥ साक्षात्कार परब्रह्म । तो हृदयींच असे आत्माराम । त्याच्या ठायीं भजन प्रेम । आपीं संभ्रम स्वानंद ॥ १२ ॥ आत्माराम जनार्दन । जगीं राहिला व्यापून । म्हणूनि जगद्रुप भजन । दावी आपण येकनाथ ॥ १३ ॥ भूतदया सर्वांठायीं । येकनाथासी सारखी पाही । पारिखे नेणें कांहीं । सर्वांठायीं समभावो ॥ १४ ॥ दोनी प्रहर करितां स्नान । गर्दभासी पाजिलें जीवन । तेंहीं सांगेन निरूपण । सावधान अवधारा ॥ १५ ॥ आडाचें काढोनी जीवन । येकनाथ करितां स्नान । तों तृषाक्रांत होऊन । आलीं संपूर्ण गर्दभें ॥ १६ ॥ कैकाड्याचीं गर्दभें जाण । चरत प्रवेशलीं नगर भुवन । येकनाथ करीत असतां स्नान । अकस्मात जाण तेथें आलीं ॥ १७ ॥ चरत फिरत आलोआली । तृषाक्रांत बहुत जालीं । येकनाथाच्या स्नानकाळीं । आडा जवळीं पातलीं ॥ १८ ॥ एकाचि कळप आला जाण । मोजेनी पाहतां शतमान । पाहात येकनाथाचें वदन । तटस्थ जाण राहिलीं ॥ १९ ॥ तें देखोनि येकनाथ । बहुत कळवळलें

चित्त । म्हणे यांचे ठायीं भगवंत । तृषाक्रांत फार जाला ॥ २० ॥ मग लोह कढई आणविली जाण । पोहरा घालोनी काढी जीवन । हृदयीं स्मरोनी जनार्दन । पाजिलें जीवन गर्दभां ॥ २१ ॥ जीवन देखोनि निश्चित । पशू येकापुढें येक धावत । येकमेका लाता हाणित । स्वयें फोडीत थोबाडें ॥ २२ ॥ ऐसीं तृषाक्रांत बहुत जालीं । त्यांसि जीवन पाजोनि तृप्त केलीं । येकनाथाची कीर्ति भली । विस्तारली जगामाजी ॥ २३ ॥ तृप्तता पावोनी पूर्ण । परतोनी गेले पशू आपण । येकनाथ करोनी स्नान । आले आपण गृहामाजीं ॥ २४ ॥ येकनाथ आले करोनी स्नान । जालिया संध्या जप ध्यान । मग आरंभी देवतार्चन । तें महिमान अवधारा ॥ २५ ॥ येकनाथाचें देवतार्चन । अतिशयेंसी श्रेष्ठपूर्ण । पाहातां तनमना भुलवण । फिटे पारणें डोळीयाचें ॥ २६ ॥ मूर्ति पाहातां साजिरी । ध्यानीं ठसावे निरंतरीं । सबाह्य आणि अभ्यंतरी । पूजा करी येकनाथ ॥२७॥ केशव तोचि नारायण । येका पूजा करी आपण । माधव मूर्तिचें पूजन । सावधान करीतसे ॥ २८ ॥ केशव तो सदानंद । नारायण तो चिदानंद । माधव मूर्ति आनंदकंद । सच्चिदानंद गोविंद ॥ २९ ॥ श्रीविष्णु मधुसूदन । त्रिविक्रम तोचि वामन । या मूर्तीचें पूजन । येकलें जाण येका करी ॥ ३० ॥ षडैश्वर्य लक्ष्मी सधर । ज्याचे हातीं निरंतर । म्हणोनि नाम श्रीधर । म्हणवी साचार हृषीकेशी

॥३१॥ ते श्रीधर हृषिकेश मूर्ति । येका पूजी स्वानंद गती। नाभी ब्रह्मयाची उत्पत्ति । ते पद्मनाभ मूर्ति पूजित ॥३२॥ दामोदर आणि संकर्षण। वासुदेव जाला आपण। प्रद्युम्न अनिरुद्ध संपूर्ण । पुरुषोत्तम आपण स्वयें जाला ॥ ३३ ॥ नवल देवतार्चनाची वोज । पदोपदीं अधोक्षज । नरसिंह मूर्ति उग्रतेज। स्वानंद भोजे पूजित ॥ ३४॥ अच्युत नामाचा बडिवार। स्वयें मिरवी साचार । तो पूजिला निर्धार । शोडषोपचारें जर्नादन ॥३५॥ अच्युत आणि जनार्दन । उपेंद्र झाला आपण । साक्षी श्रीहरी संपूर्ण। प्रत्यक्ष श्रीकृष्ण सर्वदा ॥३६॥ चोवीस नामाच्या मूर्ति । देव्हारा वैसवी येकपंक्ति । याही वेगळ्या असंख्य मूर्ति । पूजी निश्चिती येकनाथ ॥३७॥ पूजी दशावतार मूर्ति । मध्यभागीं गौरीपती । अर्धांगी सहीत पार्वती । शोभा निश्चिती देव्हारा ॥ ३८ ॥ श्रेष्ठ खाणी कुळदैवता । जे का येकवीरा येकनाथा । जगीं मिरवली येकात्मता । हे कुळदैवता येकनाथाची ॥ ३९॥ जगीं व्यापिली येकपण । म्हणूनी येकवीरा म्हणवी आपण । तेचि ठेवुनी नामाभिधान । मिरवी भूषण येकनाथ ॥ ४० ॥ ऐसें करितां देवार्चन । तव आला येक ब्राह्मण । सर्वांग गळे रोगानें । रक्तपितीने व्यापला ॥४१॥ आंगीं रक्तपिती भरली। तेणें सर्वांगा धार लागली । तेणें ब्राह्मण तो तळमळी । दुर्गंधी चालली शरिरीं ॥४२॥ सर्वथा न गमे स्वगृहीं । मग यात्रे चालिला पाहीं । उठत बसत चाले लवलाहीं । ठायीच्या ठायीं

आक्रंदत ॥४३॥ जन जाती वाराणसी । मी ही जाईन निश्चयेसी । मरण आलिया वाटेसी । स्वयं मुक्तीसी पावेन ॥४४॥ काशीस जातां पूर्ण । अवचट मार्गी पावे मरण तात्काळ त्यासी मोक्षस्थान । ऐसें सज्जन बोलती ॥४५॥ मी परम पापिष्ट पूर्ण । मज न घडे काशीचें दर्शन । मार्गींच पावेन मरण । ऐसें संपूर्ण पैं कळलें ॥४६॥ ऐसा विचार करूनी हृदयीं । यात्रे निघाला लवलाही । पाव कोश चालतां भूई । प्राणांत पाही होतसे ॥४७॥ मार्गीं चाले रडत पडत । सर्वेचि बैसे चडफडत । देवा मरण दे कां मातें । म्हणोनि रडत दीर्घ स्वरें ॥४८॥ ऐसे परी नित्य चालत । पैठणा आला सुनिश्चित । नगराबाहेर बैसला कुंथत । होवोनि चित्तांत व्याकुळ ॥४९॥ सर्वांगीं लागल्या रुधिर धारा । कापत बैसला थरथरा । अनुतापोनी म्हणे हरिहरा । पाव शंकरा म्हणे वेगीं ॥५०॥ ईश्वर स्मरण संयुक्त । ब्राह्मण जाला निद्रिस्त । स्वप्नीं येवोनी कृपावंत । स्वयें बोधित तयासी ॥५१॥ म्हणे नाभि नाभि रे ब्राह्मणा । कां त्यजू पाहसी प्राणा । शरण जाई संत चरणा । तुझी व्यथा जाण दूरी होय ॥५२॥ स्वयंप्रकाश शुद्ध बोधू । या नगरांत आहे साधू । येकनाथ नांव प्रसिध्दू । आहे वंद्य सर्वांसी ॥५३॥ तयापाशीं दोनी पुण्य । समानस्कंद[1] आहेति जाण । तुज मी सांगेन खूण । सावधान अवधारी ॥५४॥

[1] सारख्या योग्यतेचीं.

येक महाभागवत श्रवण । येक शत गर्दभा पाजिलें जीवन दोन्हीं पुण्यें तत्समान । आहेति जाण त्यापाशीं ॥ ५५ ॥ तुवां जावें अनन्य शरण । घालूनी त्यासी लोटांगण । येक पुण्य घ्यावें मागून । मग जाईल हरून वेथा तुझी ॥ ५६ ॥ येक पुण्य सोडिल्या उदक । सर्वोचि घेउनी चरणोदक । सर्वोचि स्नान करितां देख । तात्काळिक शुद्ध होसी ॥ ५७ ॥ आता नवजावें यात्रे । तू परम दोषी अपवित्र । साधु दर्शनी होसी पवित्र । वचन मात्र ऐकोनी ॥ ५८ ॥ स्वप्नीं ऐकोनी वचनाला । ब्राह्मण जाग्रतीस आला । विसीत होवोनी उभा ठेला । म्हणे जाऊं वहिला साधुदर्शना ॥ ५९ ॥ जे साधूचें दर्शन घडे । त्याचें पाप तात्काळ उडे । परम पवित्रता जोडे । वाडेकोडें निश्चित ॥ ६० ॥ सहज दर्शनाचें महिमान । परम लाभ आहे जाण । साक्षपूर्वक नारायण । दृष्टांत जाण सांगितले ॥ ६१ ॥ कैसा साधू आहे कोण । पाहूं पुण्य परायण । म्हणोनि चालिला ब्राह्मण । प्रवेशला जाण नगरांत ॥ ६२ ॥ चाले कण्हत कुंथत । जनासि ब्राह्मण घर पूशित । कोठें आहे येकनाथ । दावा त्वरित मजलागी ॥ ६३ ॥ त्याचे आंगिची पाहूनि वेथा । कंटाळा येत समस्ता । पडे रडे मार्ग चालिता । आला तत्वता साधुगृहा ॥ ६४ ॥ सन्मुख देखोनि येकनाथ । त्याच्या चरणावरी लवंडित । कपाळ पिटोनी हात । आक्रंदित दीर्घ स्वरें ॥ ६५ ॥ येकनाथ पुसे बापा तूं कोण । कां करतोसी सांग रुदन । तुझ्या सर्वांगीं व्यथा पूर्ण । जर्जर जाण तनू दिसे ॥ ६६ ॥ ब्राह्मण

बोले वचन । अंगीं रक्तपिती भरोन । मरतो यांचवी माझा प्राण । कृपा करून स्वामीया ॥ ६७॥ मी जात होतो यात्रेसी येथें आलों वस्तीसी । स्वप्नीं येवोनि मजपाशीं । देवें निश्चियेंसी सांगीतलें ॥ ६८ ॥ या नगरामाजि संपूर्ण । आहे येकनाथ दयाघन । त्यासि जावोनिया शरण । अनन्य नमन करावें ॥६९॥ भागवत श्रवणाचें पुण्य । आणि गर्दभांसी पाजिलें जीवन । हीं दोनीं पुण्यें समान । त्यांमाजी मज अर्पण येक करी ॥७०॥ ऐसें सांगितलें स्वप्नीं । येक पुण्य द्यावें मजलागोनि । म्हणूनि लागला चरणीं । नत होवोनी अति नम्र ॥७१॥ मज देवोनि पुण्य येक । तीर्थ द्यावें चरणोदक । स्नान मात्रें रोग शोक । जाईल देख निःशेष ॥७२॥ निःशेष जाईल अंगीची वेथा । त्रिसत्य स्वप्न नव्हे अन्यथा । आतां कृपा करावी समर्था । चरणीं माथा ठेवित ॥ ७३ ॥ हरोनि माझें दुःख । तुवां द्यावें परम सुख । तूं दाता सुखदायक । म्हणोनि देख शरण आलों ॥ ७४ ॥ शरणांगताचि उपेक्षा करणें । साधूसी योग्य नव्हे जाण । मग आम्हासी उद्धरी कोण । तुम्हावाचून स्वामीया ॥ ७५ ॥ येक पुण्य दिधल्या मज कारण । तेणें व्यथा जाईल जाण । म्हणोनि धरिले दोनी चरण । सर्वथा जाण सोडीना ॥ ७६ ॥ देखोनि ब्राह्मणाचा निर्धार । येकनाथ करी विचार । मिळूनि वृद्ध थोर थोर । विवेक समग्र करिते जाले ॥ ७७ ॥ कोणतें द्यावें पुण्य । कोणतें राखावें आपण । सारासार विचार करून । येक पुण्य नेमिलें ॥ ७८ ॥

गर्दभांसी पाजिलें पाणी । ते पुण्य राखावें स्वस्थानीं । भागवत श्रवण या लागूनि । द्यावें हें मनीं दृढ केलें ॥ ७९ ॥ भागवत श्रवण येक दिधल्या यासी । आणखी श्रवण घडेल आम्हांसी । निर्धार केला निश्चियेसी । म्हणे पुण्य असे ब्राह्मणा ॥ ८० ॥ महाभागवत येक श्रवण । घ्यावें म्हणोनि सोडी जीवन । ब्राह्मण सुखाउनी पूर्ण । करी नमन साष्टांग ॥ ८१ ॥ सवेंचि दीधले चरणतीर्थ । ब्राह्मण तीर्थ स्नान करीत । तेणें जाला देह पुनीत । व्यथा समस्त दुरावली ॥८२॥ भागवत श्रवणाचें पुण्य येतां । ब्राह्मणासी नाठवे देहाची वेथा । तिनी दिवसामाजी तत्वता । सुचिर्भूतता शरीरीं ॥८३॥ तृतीय दिवशीं जाण । ब्राह्मण सर्वांगीं पावन । विस्मीत जाले सकळ जन । म्हणती धन्य श्रवण भागवताचें ॥ ८४ ॥ भागवत श्रवण महिमान । परिक्षितीसी घडलें जाण । श्रीशुकयोगेंद्र आपण । वक्ता निधान तिहीं लोकीं ॥ ८५ ॥ शुक मुखींचें अमृत फळ । तें भागवत जाण रसाळ । श्रवण मात्रें केवळ । होय कलिमळ विध्वंसन ॥ ८६ ॥ श्रवणामाजी श्रेष्ठ श्रवण । भागवत श्रवण अगम्य जाण । अगम्य श्रवणाचें महिमान । परिक्षिती जाण उद्धरिला ॥ ८७ ॥ सात दिवसामाजी जाण । परिक्षितीसी घडलें श्रवण । ब्रह्मशापा नातव्हन । ब्रह्म संपन्न स्वयें जाला ॥ ८८ ॥ ब्रह्मशाप बाधिला तया देहासी । परिक्षिती गेला विष्णु लोकासी । भागवत श्रवण महिमा ऐसी । कळली द्विजासी साक्षेप ॥ ८९ ॥ तीन दिवसा-

माजि जाण । ब्राह्मण पावला समाधान । व्यथा गेली हारपोन । सबाह्य आपण उजळला ॥ ९० ॥ शरीर उजळलें निर्मळपणें । अंतरीं उजळला ज्ञानघन । अष्टांगीं जाला पावन । भागवत श्रवण स्वानंदें ॥ ९१ ॥ धन्य धन्य तें भागवत । जेथें उल्हासला परमार्थ । धन्य धन्य तो येकनाथ । सदोदित श्रवणार्थी ॥९२॥ येकनाथानी श्रवण पुण्य । सर्वे दिधलें मजलागून । शोक दुःख गेले हारपोन । म्हणे ब्राह्मण पैं माझें ॥ ९३ ॥ येकनाथासी नमस्कार । स्वयें करी द्विजवर । म्हणे तुझा अपरंपार । जाला उपकार येकनाथा ॥ ९४ ॥ यासी व्हावया उत्तीर्ण । कांहींच पदार्थ नाहीं जाण । म्हणोनि घातलें लोटांगण । म्हणे हेचि उत्तीर्ण सर्वथा ॥ ९५ ॥ येकमका करिती नमन । येकमेका आलिंगन । चरणरजाचें वंदन । करिती संपूर्ण स्वानंद ॥ ९६ ॥ येकनाथासी प्रदक्षिण । स्वयें करी तो ब्राह्मण । पुन्हा वंदोनि दोनी चरण । निरोप घेवोनि निघाला ॥ ९७ ॥ निरोप घेवोनि माघारा । ब्राह्मण पातला आपुल्या नगरा । येकनाथ कीर्तीचा फरारा । उभवी साचारा जगामाजी ॥ ९८ ॥ ऐसें येकनाथाचें चरीत । पुण्य पुरूप श्रवण करीत । त्यासी कृपा करी भगवंत । संत भगवंत येकरूप ॥ ९९ ॥ हें प्रतिष्ठान

चरित्र षष्ठी थोर। आमुचे कुलधर्म मल्हार। संत मिळोनी अपार। उधळती भांडार आनंदाचा ॥ १०० ॥ म्हणे कृष्णदास जगदानंद। नंदन श्रीनाथ पदारविंद। सेवोनि चरण मकरंद। सच्चिदानंद स्वयें जाला ॥ १०१ ॥ इति श्री प्रतिष्ठान चरित्र षष्ठोऽध्यायः ॥ संपूर्णोस्तु ॥ ६ ॥
॥ श्रीयेकनाथार्पणमस्तु ॥

॥ श्रीउद्धवार्पणमस्तु ॥

# अध्याय ७ वा

[ एकनाथस्वामींची समदृष्टी—पंढपूरचा परिसा भागवत ब्राह्मण—त्यानें केलेली रुक्मिणीची आराधना—देवी त्याला परीस देते—ब्राह्मण महायात्रेला निघतो—बरोबर परीस घेतो—परिसाच्या जपणुकीविषयीं विवंचना—पैठणास येऊन एकनाथस्वामींकडे सांभाळण्याकरितां परीस देतो—एकनाथस्वामी तो गंगेत टाकितात—ब्राह्मण अर्धी यात्रा टाकून परत येतो—एकनाथस्वामींकडे परिसाची मागणी—परीस डोहांत टाकिला हें ऐकून ब्राह्मणानें घेतलेलें धरणें—एकनाथस्वामी त्याला गंगेवर नेतात—गंगेतील सगळेच दगड परीस झाल्याचा साक्षात्कार—ब्राह्मणाचा पश्चाताप—ब्राह्मण परीस ब्रह्मार्पण करून पुनश्च महायात्रेस जातो. ]

श्रीगणेशाय नमः ॥ धन्य धन्य प्रतिष्ठान। धन्य येकनाथ निधान। गुरूभक्तीचें महिमान। जगीं संपूर्ण दाविलें ॥१॥ गुरूभक्तीचा प्रताप गहन। सिद्धी तिष्ठती हात जोडून। नवमानिधि संपूर्ण। वश्य जाण गुरुभक्ता ॥ २ ॥ जें इच्छी जे, जे समयीं। तें तें वासनेसारिखें पाहीं। हे सिद्धीची नवाई। ठायींच्या ठायीं तिष्ठत ॥ ३ ॥ येकनाथाच्या गृहांत। सिद्धी लेकुरापरी खेळत। जें जें इच्छी येकनाथ। तें तें तिष्ठत स्वसिद्ध ॥ ४ ॥ सिद्धी वोळगल्या अंगणीं। खडे होती चिंतामणी। परीस उद्भवे पाषाणीं। अतर्क्य करणी सिद्धीची ॥ ५ ॥ पंढरी क्षेत्रा आंत। भक्त होता भागवत[1]। निष्ठा भक्तीनें निरत। सेवा करीत रुक्मिणीची ॥ ६ ॥ ते रुक्मिणी जगन्माता। निःकाम बुद्धीनें सर्वथा। भागवत

१ परिसा भागवताची ही गोष्ट नामदेवाच्या चरित्रांतही अशीच प्रसिद्ध आहे. नामदेव व एकनाथस्वामी यांच्या काळांत सुमारें सव्वादोनशें वर्षांचें अंतर

सेवा करीत असतां । येक निष्ठतां सेवेसी ॥ ७ ॥ द्वादश वरुषें पर्यंत । भक्ति भावें सेवा करित । तुष्टोनी देवी समर्थ । म्हणे यातें काय द्यावें ॥ ८ ॥ याची कामनारहित भक्ती । यासी काय द्यावें निश्चितीं । अवंचक याची स्थिती । परम भावार्थी हा भला ॥ ९ ॥ प्रसन्न होवोनि देवी बोलत । तुज काय पाहिजे सांग मात । परिसा साष्टांग प्रणिपात । करोनि बोलत देवीसी ॥ १० ॥ मातें तुज जें मानलें उचित । तेंचि मज द्यावें निश्चित । म्हणोनि तो भागवत । करी दंडवत देवीसी ॥ ११ ॥ माते तुझ्या येईल जें मना । तेंचि देवोनि पुरवी कामना । तुझ्या आज्ञेचा मी पोसणा । म्हणोनि चरणा लागला ॥ १२ ॥ पाहोनि त्याचे मनोगत । जगन्माता कृपा करीत । म्हणे स्वार्थी नव्हे निश्चित । परम भक्त प्रामाणिक ॥ १३ ॥ रुक्मिणी विचारी विठ्ठलासी । काय द्यावें या भक्तासी । द्वादश वरुषें निश्चियेंसी । जाला भक्तीसी सादर ॥ १४ ॥ कृपा करोनि सांगावें आतां । यासी द्यावें कवण्या पदार्था । तुम्हां योग्य देणें जगन्नाथा । तेंचि तत्वता सांगावें ॥ १५ ॥ ऐकोनि

---

( मागील पृष्ठावरून )

आहे, अर्थात् कोणातरी एकाच्या चरित्रांतच ही गोष्ट झाली असणें शक्य आहे परिसा भागवत नामदेवांच्या समकालीन होता असें मानण्यास बराच आधार असल्यामुळें त्याच्या चरित्रांतच ही गोष्ट घडली असे मानणें अधिक सयुक्तिक आहे. एकनाथस्वामींच्या चरित्रांत दुसऱ्या एखाद्या ब्राह्मणाचा असाच प्रकार झाला असून प्रस्तुत ग्रंथकर्त्यानें त्याला चुकीनें परिसा भागवत असें नांव दिलें असण्याचा संभव आहे.

रुक्मिणीच्या वचनास । हासिला रुक्मिणीविलास । म्हणे द्यावा येक परीस । जेणें नासे दरिद्रता ॥ १६ ॥ परिस लागल्या लोहात । होती सुवर्णांचे पर्वत । हेंचि द्यावें भागवतातें । हें पंढरीनाथें निरोपिलें ॥ १७ ॥ ऐकोनि विठ्ठलाचें वचन । रुक्मिणी मतोपली पूर्ण । मग भागवतातें पाचारून । दिधला जाण स्पर्शमणी ॥ १८ ॥ म्हणे माझा स्पर्शमणी । म्या दिधला तुज लागोनी । जतन करी ना अंतःकरणीं । पारखे कोणी पाहती जन ॥ १९ ॥ ऐसे सांगोनि भागवता । अदृश्य जाली जगन्माता । तो परीस घेवोनिया हाता । नाचे तत्वता उल्हासें ॥ २० ॥ रुक्मिणीनें दिधला परीस । म्हणोनि परिसा भागवत नाम सुरस । जगीं मिरवलें सावकास । अति उल्हास स्वानंदें ॥ २१ ॥ तो घेवोनि स्पर्शमणी । मस्तक ठेवोनी रुक्मिणीचरणीं । विठ्ठलातें आलिंगोनी । तत्क्षणीं निघाला ॥ २२ ॥ करोनी चंद्रभागेचें स्नान । पुंडलीकातें नमोन । क्षेत्र प्रदक्षणा करून । निघे आपण महायात्रे ॥ २३ ॥ स्वयें चालिला वाटे । परिसासी न विसंबे कोठें । मोहो उपजला उद्भट । माजत चळकट बांधिला ॥ २४ ॥ परीस आहे किंवा नाहीं । हे क्षणक्षणा पाहातसे पाही । लंपट जाला लवलाहीं । विषय पाही दुर्घट ॥ २५ ॥ विपर्यी लंपट आलें मन । क्षणक्षणा पाहे सोडून । संदेह उपजला दारुण । मोहो जाण झळंबला ॥ २६ ॥ मार्गी कोणी करतील हरण । या निमित्य जाईल माझा प्राण । दुर्घट वोढविलें जाण । काय करणें म्यां आतां ॥ २७ ॥

त्रिलोकीची संपत्ती । परिसामाजी आहे निश्चिती । षडैश्वर्य[1] यश कीर्ती । येथें तिष्ठती स्वानंदें ॥ २८ ॥ मार्गी नेऊं नये मणी । हा ठेवोनी निर्लोभ भुवनी । नैराश्य साधू असेल कोणी । तेथें ठेवोनी जाऊ यात्रे ॥ २९ ॥ महा यात्रा करोनी । सर्वेची परतोनी । मागोनी घेऊं स्पर्शमणी । हा विचार मनीं दृढ केला ॥ ३० ॥ नैराश्य साधू दयाळ । जगीं येकनाथ आहे कुशळ । निर्लोभी परम निर्मळ । आहे केवळ पैठणीं ॥ ३१ ॥ तेथें जाऊनि पैठणासी । नमस्कार करोनि चरणासी । मणी द्यावा त्या पाशीं । निश्चिती आम्हासी मग होईल ॥ ३२ ॥ ऐसा करोनि विचार । पैठणा आला साचार । देखूनिया तें नगर । हर्षे निर्भर पैं जाला ॥ ३३ ॥ तद्दिनी पर्वकाळ पूर्ण । गंगातीर अति पावन । येकनाथ करूं आले स्नान । भागवत जाण तेथें आला ॥ ३४ ॥ पवित्र स्थान गोदातीर । पाहतां वाटे आनंद थोर । तेथें भागवत हर्षे निर्भर । करी नमस्कार येकनाथासी ॥ ३५ ॥ येकनाथासी करोनि नमन । स्वयें दीधलें आलिंगन । मग बैसोनी आपण । येकांत वचन बोलतु ॥ ३६ ॥ भागवत करी विज्ञापना । महा यात्रे जातों आपण । स्वामीनें कृपा करून । मणी जतन करावा ॥ ३७ ॥ प्रसन्न करोनि रुक्मिणी । मागूनि घेतला स्पर्शमणि । हा येकाभुवनीं । जतन करोनि ठेवावा ॥३८॥

---

१ यश, श्री, औदार्य, ज्ञान, वैराग्य आणि ऐश्वर्य.—हे ऐश्वर्यांचे सहा गुण सांगितले आहेत.

मार्गीं करतील हरण । या लागी भय वाटतें दारुण । तुम्हांपाशीं ठेऊन। जाईन आपण यात्रेसी ॥ ३९ ॥ महायात्रा करोनी । मागुता येतों परतोनी । हा माझा स्पर्शमणी। मज लागूनी पैं द्यावा ॥ ४० ॥ यावरी न पडावी कोणाची दृष्टी । कोणाची न व्हावी भेटी । जतन करा बांधूनि कटीं। अथवा पाटी ठेवावा ॥ ४१ ॥ बहूत जतन करा मणी । म्हणूनि लागला चरणीं । अभय दीधल्या निर्भयपणीं । यात्रा करोनी येईन ॥ ४२ ॥ ऐकोनि हासिले येकनाथ। म्हणे यात्रे जावें निर्भय चित्तें । मणी दीधला पंढरीनाथें। तोचि येथें रक्षील ॥ ४३ ॥ चित्त करोनिया स्थिर । यात्रेसी जावें साचार । मणी आठविताचि जिव्हार । परतोनि माघारें न यावें ॥ ४४ ॥ करोनिया भागीरथी स्नान । विश्वेश्वराचें दर्शन । घेवोनी करा गयावर्जन। त्रिवेणी स्नान प्रयागीं ॥४५॥ प्रयागीं अक्षय वट। विष्णुपद पहावें गोमटें । पितरासी लाऊनि मोक्ष वाटे । यावें नीट येणें मार्गें ॥ ४६ ॥ आम्हासि देउनी दर्शन। चरण तीर्थ आलिंगन। आपुला स्पर्शमणी घेऊन । गेलें स्वामीनें पाहिजे ॥ ४७ ॥ ऐकोनि येकनाथाचें वचन । भागवत आनंदला पूर्ण । मग नमस्कार करून । गेला आपण यात्रेसी ॥ ४८ ॥ यात्रेसि गेला निर्भयपण । मग येकनाथें केलें स्नान । संध्या आणि तर्पण। तेथेंची जाण सारिलें ॥ ४९ ॥ भागवताचा स्पर्शमणी । स्वयें ठेवावा निर्भय स्थानीं । स्थान पाहातां शोधूनी । अंतःकरणीं

नये मना ॥ ५० ॥ येक शोधिलें निर्भय स्थळ । डोहो भरला गंगाजळ । पवित्रोदक निर्मळ । तेथें तात्काळ टाकिलें ॥ ५१ ॥ गंगेच्या जीवनीं । तेथें टाकिला स्पर्शमणी । गंगेसी नमस्कार करोनी । आला स्वस्थानीं येकनाथ ॥ ५२ ॥ येरीकडे भागवत । स्वयें चालिला निर्भय चित्त । वाराणसी महातीर्थ । आला तेथें क्षेत्रासी ॥ ५३ ॥ करितां मणिकर्णिका स्नान । स्पर्शमणी आठवला जाण । कैंचे स्नान संध्या तर्पण । लागलें ध्यान परिसाचें ॥५४॥ कैचा येकनाथ साधू । परिसा भोवता भोवला भोंदू । गोड बोलाचा केला बोधू । बुद्धिमंद मी येक ॥ ५५ ॥ मज देवीनें सांगीतलें जाण । दुजया स्पर्शों नेदावें आपण । स्पर्शल्या हारपेल पूर्ण । ऐसें संपूर्ण सांगितलें ॥ ५६ ॥ रुक्मिणीनें दीधली आज्ञा । स्पर्शों नेदावें कवणा । मज मूर्खा आज्ञाना । बुद्धी जाणा न सुचली ॥ ५७ ॥ कैची यात्रा कैचें तीर्थ । परिस राहिला पैठणांत । व्याकूळ होवोनी मनांत । माघारी त्वरीत निघों पाहे ॥ ५८ ॥ टाकून अमृताचे भाण[1] । कांजीसाठीं फिरो आपण । तैसा भागवत जाण । फिरे आपण माघारा ॥ ५९ ॥ टाकोनि यात्रेचें माहिमान । विषयालागी परतला आपण । अधिकाधिक करूनि गमन । आला पैठणा ॥ ६० ॥ येकनाथाच्या गृहा आंत । येउनी साष्टांग प्रणिपात । करिता जाला भागवत । चिंताक्रांत दिसतु ॥ ६१ ॥ येकनाथ म्हणे त्वरा केली । यात्रा काय संपूर्ण जाली । धावत आला उतावेळीं ।

---

१ वाढलेलं ताट.

दर्शन दिधलें पवित्रता ॥६२॥ तुमच्या दर्शनें पवित्र जालों । आणि सर्वांगीं निवालों । आम्हीं यात्रेचें फल लाधलों । दर्शनें पावलों तुमच्या ॥ ६३ ॥ तुम्हीं प्रत्यक्ष जनार्दन । दर्शनें केलें आम्हां पावन । म्हणूनिया साष्टांग नमन । केलें संपूर्ण येकनाथें ॥६४॥ आणूनी तप्त जीवन । भागवताचें चरण क्षाळण । करी चरण तीर्थ वंदन । स्नान पान उल्हासें ॥६५॥ परिसा भागवत साधू घरा आला । म्हणून घातल्या रंगमाला । ध्वजा उभारिली अंतराळा । सुमन माळा साजिऱ्या ॥६६॥ टाळ मृदंग भेरी । हरिकीर्तन गाती गजरीं । टाळ्या वाजविती कुसरी । नामोच्चारीं निज छंद ॥६७॥ सर्वा मुखीं नामावली । तेणें सकळ पापाची होय होळी । हातें वाजवितां टाळी । दोष अंतराळी जळाले ॥ ६८ ॥ हरीचें नामामृत पान । भागवतासी करविलें जाण । गंधाक्षता सुमन । अर्पून जाण तोषविला ॥६९॥ प्रार्थना करोनि भागवतासी । वोगरिलें आरोगणेंसी । तांबूल अर्पुनी चंदनासी । सर्वांगासी चर्चिलें ॥७०॥ स्वस्थ बैसला येकनाथ । भागवतासी उत्कंठा बहुत । म्हणे आम्हीं आहो गृहस्थ । आमुची वस्त आम्हां द्यावी ॥ ७१ ॥ स्वामीपाशीं ठेविला परास । आमुचा द्यावा आम्हांस । जाणें आमच्या ग्रामास । दूर वास आमुचा ॥७२॥ परिसाची आठवण करितां । सरण जाला येकनाथा । मग प्रति उत्तर जाला देता । तया भागवता ब्राह्मणासी ॥ ७३ कोणाचा न पडावा धारा । पाहूनिया येकांत थारा । परीस जिवासी जतन करा ।

ऐसें द्विजवरा मागीतलें ॥ ७४ ॥ म्हणोनिया येकांत स्थळ। सखोल डोहो प्रबळ । गंगाजळीं केवळ । आहे निर्मळ तें वस्तु ॥ ७५ ॥ आहे परीस गंगाजळीं । भय नाहीं कदा काळीं । गंगेनें रक्षिला आपणा जवळी । प्रातःकाळीं शोधोनि देऊं॥७६॥ ऐकोनि येकनाथाचें वचन । ब्राह्मणाचें गजबजलें मन । धीर न धरवे जाण । कंपायमान बोलतु ॥ ७७ ॥ महापूर आला गंगाजळा । परीस असेल वाहवला । म्यां कां याचे हातीं दिधला । वेडावला भागवत ॥ ७८ ॥ भागवत वेडावला पूर्ण । परिस गेला वाहून । आतां त्यजीन आपुला प्राण । म्हणोनि धरणें बैसला ॥ ७९ ॥ येकनाथासी बोले ब्राह्मण । आमुची वस्तू आणून देणें । नाहीं तरी त्यजीन प्राण । सत्य जाण येकनाथा ॥ ८० ॥ ऐकोनि ब्राह्मणाच्या बोला । येकनाथ गंगेसी आला । गंगे सन्मूख उभा ठेला । न्याहळूं लागला निजदृष्टा ॥ ८१ ॥ निजात्मदृष्टीचें देखणें । येका स्वयेंचि आपण । सर्वांग देखणा संपूर्ण । समसमान समत्वें ॥ ८२ ॥ समदृष्टीचें देखण । येका परीस शोधी आपण । गंगेमाजील पाषाण । परीस जाण होवोनि ठेले ॥ ८३ ॥ हातीं लागे जो जो पाषाण । तो तो परीस होता जाय आपण । येकनाथ ब्राह्मणासी म्हणे । तुझा कोणता वोळखी ॥ ८४ ॥ पाषाण अवलोकितां नयनीं । तेचि होतीं स्पर्शमणी । येकनाथ हा पूर्णपणीं । समदर्शनीं देखतू ॥ ८५ ॥ पूर्ण दृष्टीचें महिमान । परीस जाले पाषाण । थकीत जाला ब्राह्मण । पुढें बोलणें

सुचेना ॥ ८६ ॥ येकाहूनि येक । दिव्यमणी ब्राह्मण देख । आपुले आणि पारखे । ब्राह्मणासी देख सरेना ॥ ८७ ॥ कैसा होता आपुला परीस । ब्राह्मणासि नाठवे निःशेष । ठक पडिलें द्विजास । थोर स्वास घातला ॥ ८८ ॥ मग पश्चात्तापें मनीं । हृदयीं आठविली रुक्मिणी । मणी तुझा ब्रह्मार्पणीं । तुज लागोनी पावला ॥ ८९ ॥ करितां देवीसी अर्पण । संशय गेला हारपोन । निःसंदेह जाला ब्राह्मण । बुद्धि निर्विघ्न सूचली ॥ ९० ॥ बारा वरुषें केली भक्ती । म्हणोनि येक परिस दीधला हातीं । न घेता करितो आणिक भक्ती । वैकुंठभासी पावतों ॥ ९१ ॥ परिस देवोनि ठकिलें मातें । तोही हारपला येथें । लाघव दाविलें येकनाथें । निःकामातें पावावया ॥ ९२ ॥ निःकाम भजनाचें महिमान । येकनाथें दाविलें आपण । हातीं धरिता पाषाण परीस जाण स्वयें जाला ॥ ९३ ॥ जळो माझी सकामता । यात्रा श्रेया हाणोनि लाथा । धावत आलो विषयार्था । तें ही तत्वता हारविलें ॥ ९४ ॥ जळो विषयाचा संबंधू । सेऊ येकनाथ पूर्ण साधू । पाषाणीं परीस उद्बोधु । अगाध बोधू संतांचा ॥ ९५ ॥ म्हणोनि घातलें लोटांगण । मी अपराधी संपूर्ण । कृपा करावी दयाघन । निःशंक महिमान पावावया ॥ ९६ ॥ संतुष्टोनि येकनाथें । कृपेनें मस्तकीं ठेविला हात । यात्रे जावया आज्ञा देत । कृपायुक्त निजबोध ॥ ९७ ॥ आज्ञा देत संपूर्ण । परिसा भागवत आपण । महायात्रे कारण । चरण वंदूनि

निघाला ॥ ९८ ॥ हें प्रतिष्ठान चरित्र सप्तदिन । रथारुढ नारायण । स्वयंज्योति प्रकाशमान । विराजमान निज-तेजें ॥ ९९ ॥ म्हणे कृष्णदास जगदानंद । नंदन श्रीनाथ पदारविंद । सेवोनि चरण मकरंद । सच्चिदानंद स्वयें जाला ॥ १०० ॥ इति श्री प्रतिष्ठान चरित्र भागवत । महिमा वर्णनोनाम । सप्तमोध्यायः ॥ संपूर्णोस्तु ॥७॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

श्रीउद्धवार्पणमस्तु

# अध्याय ८ वा

[ एकनाथस्वामींच्या घरीं पितृतिथी—ब्राह्मणांना निमंत्रण—ते स्नानास जातात—स्वयंपाकाकरितां महार लाकडें घेऊन येतात—त्यांना अन्नाचा घमघमाट येतो—ते भोजन मागतात—एकनाथस्वामी त्यांना जेऊं घालतात—ही वार्ता मागिणींकडून नदीवर ब्राह्मणांना कळते—त्यांचा संताप—ते एकनाथस्वामींचे घरीं भोजन करण्याचें नाकारतात—एकनाथस्वामी पितरांना बोलावितात—पितरांचें आगमन व भोजन—ब्राह्मणांचा गर्वनाश. ]

श्रीगणनाथाय नमः ॥ श्रीयेकनाथ कृपाघन । वंदोनि त्याचे श्रीचरण । सांगेन शुद्ध निरूपण । संतजन निवावया ॥१॥ त्रिविध तापें तापले पूर्ण । ते शांत करावया जाण । येकनाथ कर्तृत्व महिमान । सादर श्रवण करावें ॥ २ ॥ वडिला तिथि पुण्य श्राद्ध । येकनाथ करी प्रसिद्ध । तद्दिनी जाला आनंद । तोहि विनोद अवधारा ॥ ३ ॥ पितृतिथी पुण्य दिवस । पिंड आर्पावया पितरास । तिल तर्पण देऊन त्यांस । संतोषेसी सेवा करी ॥ ४ ॥ भोजना सांगितले ब्राह्मण । शास्त्र संपन्न परायण । पंडित पाठक विचक्षण । अवघे संपूर्ण पाचारिले ॥ ५ ॥ पितृ स्वरूपी जनार्दन । जनार्दन तोचि ब्राह्मण । येकनाथाचा भावार्थपूर्ण । सर्वांसी जाण सारिखा ॥ ६ ॥ सर्वां ठायीं समभावो । हा येकनाथाचा स्वभावो । तद्दिनीचा अभिमावो । तो नवलावो अवधारा ॥ ७ ॥ पितृतिथीसी जाण । कोणी आलिया नूतन । त्यासी घाले भोजन । तृप्त संपूर्ण पितर होती ॥ ८ ॥ गृहा आलिया मार्जर । अन्न घालावें सत्वर । मारोनि घालावें बाहीर । तेणें पितर क्षोभती ॥ ९ ॥

द्वारीं आलीया श्वान । तेथें अर्पावें अन्न । विन्मुख न व्हावें आपण । भगवद्भाव पूर्ण असावा ॥ १० ॥ जटिल मुंडी फकीर । उत्तम अधम भणग भिकार । दारीं आलिया साचार । दगड मार न करावा ॥ ११ ॥ विप्र स्वरूपी संपूर्ण । गृहा आले आपण । ऐसें मानूनिया जाण । द्यावें भोजन तयांसी ॥ १२ ॥ जें जेविती देव ब्राह्मण । तेंचि अर्पावें अन्न । वंचनार्थ केलिया जाण । पितृगण क्षोभती ॥ १३ ॥ पितृतिथीसी देख । केवळ असावें अवंचक । अतिनम्र वर्तावें देख । तेणें संतोख पितरांसी ॥ १४ ॥ तद्दिनीं येतील जे नर । त्यांसि करावा नमस्कार । गौरवोनि मधुरोत्तर । हर्षे निर्भर तोषवावे ॥ १५ ॥ भगवत्भाव संपूर्ण । तद्दिनीं असावा जाण । पितृस्वरूपी जनार्दन । संतुष्ट तेणें सर्वदा ॥ १६॥ येकनाथासी भगवत्भावो । अहोरात्र जडला पाहा वो । सर्वांभूतीं येक देवो । हा निर्वाहो भजनाचा ॥ १७ ॥ जे जे येतील आपण । प्रत्यक्ष आले जनार्दन । जैसें गुरूचें भजन । तसेंचि जाण सर्वांसी ॥ १८ ॥ श्राद्धा दिवशीं येकनाथ । अभेद सर्वांसी वर्तत । ज्याचें जैसें मनोगत । तैसे तृप्त करीतसे ॥ १९ ॥ भोजना सांगीतले द्विजगण । पाक आरंभिला संपूर्ण । काष्ठभार आणून । टाकिला जाण चांडाळें ॥ २० ॥ अनेक काष्ठांचे भार । श्वपच आणिती अपार । रचिला काष्ठांचा डोंगर । उभे समुद्र तिष्ठती ॥ २१ ॥ उत्तम तांदूळ जिरे साळी । भात केला पाकशाळीं । परिमळ झगटला तें

काळी । सर्व चांडाळीं अनुभविजे ॥ २२ ॥ उत्तम सुवास मघमघीत । चांडाळें अनुभविला भात । सन्मुख देखोनि येकनाथ । करिती दंडवत समग्र ॥ २३ ॥ चांडाळ आणि चांडाळिणी । राहिल्या उभ्या कर जोडोनी । दंडवत करिती दुरोनी । आम्हां लागोनी अन्न द्यावें ॥ २४ ॥ आम्हीं चांडाळ हीन दीन । कैचें आम्हांसी मिष्टान्न । तिखट मिळाल्या न मिळे लवण । ऐसें भोजन आमचें ॥ २५ ॥ स्वप्नीं मिष्टान्नाची वार्ता । आम्हीं नेणों येकनाथा । आली आमच्या मनोरथा । तुवां तृप्तता पैं द्यावी ॥ २६ ॥ आजी आमुचे मनोरथ । तृप्त करील येकनाथ । ऐसें आपणां आपण बोलत । संबोखीत येकमेका ॥ २७ ॥ जें ब्राह्मणांसी भोजन । तेंचि द्यावें आम्हां लागून । वंचना करिसी तरी आण । तुज्या जनार्दन गुरुची ॥२८॥ येकनाथ म्हणे आपण । सर्वांभूतीं जनार्दन । भोक्ता एकचि जाण । कल्पी भिन्न तो मूर्ख ॥ २९ ॥ सर्वां ठायीं आत्माराम । भोक्ता येक निस्सीम । हें पूर्ण ज्यासी कळे वर्म । तोचि ब्रह्म स्वतः सिद्ध ॥ ३० ॥ यांचे ठायीं जनार्दन । क्षुधित जाला आपण । त्यांसी अभय देऊनी पूर्ण । स्वस्थासन बैसविले ॥ ३१ ॥ पाकस्थळीं येऊन । येका पाहे अवलोकून । म्हणे क्षुधित झाला जनार्दन । द्यावें अन्न तयासी ॥ ३२ ॥ ते म्हणती ब्राह्मणासी । वेगीं पाठवा स्नानासी । उशीर तुमच्या पिंड प्रदानासी । आमच्या पाकासी विलंब नाहीं ॥ ३३ ॥ ब्राह्मण गेले स्नाना । बहूत क्षुधा जनार्दना । अन्न काढोनि

दीधल्या जाणा । त्याची कामना पुरवीन ॥ ३४ ॥ ते म्हणती कैचा जनार्दन । भिक्षुक आला असेल जाण । बाहेर येवोनि पाहती आपण । तव हे जन बैसले ॥ ३५ ॥ जालिया ब्रह्म भोजन । मग तयासी वाढूं अन्न । आतां वाढिल्या संपूर्ण । ब्राह्मण भोजन न करिती ॥ ३६ ॥ मग व्यर्थ होईल तुमचे महत्त्व[1] । ब्राह्मण करिती आपणां विरहित । दाटोनि करितां कां अनर्थ । ऐसें पाकस्थ बोलिले ॥ ३७ ॥ येकनाथ बोले पूर्ण । विन्मुख जाईल जनार्दन । आजि पितृतिथी संपूर्ण । पितृगण तृप्त कीजे ॥ ३८ ॥ ऐसे बोलोनि येकनाथ । दुरडींत भरला होता भात । तें उचलोनिया दोहीं हातें । बाहेर निश्चित आणिले ॥ ३९ ॥ टाकिली ब्राह्मणांची चाड । सांडिली विधिनिषेधाची भीड । भगवत्भाव जाला वाढ । निजनिवाड सर्वांभूती ॥ ४० ॥ पात्रीं भरोनि घेतलें अन्न । म्हणे तत्सद्ब्रह्मार्पण । जनीं वनीं अभिन्न । जनार्दन स्वयें भोक्ता ॥ ४१ ॥ भोक्ता एक जनार्दन । म्हणोनि वाढिलें अन्न । भक्ष भोज्यादि घृतें पूर्ण । शाखा लवण अर्पिलें ॥ ४२ ॥ तृप्त जाले स्वपच जन । अवघे आनंदलें पूर्ण । येकनाथासी करूनी नमन । गेले आपण गृहासी ॥ ४३ ॥ अन्न जेविले अपार । तृप्तता उथळली फार । येकनाथासी करोनि जोहार । गेले समग्र स्वगृहासी ॥ ४४ ॥

---

१ अर्थ, एखादें कार्य.

स्नाना गेले ब्राह्मण। येकनाथें आपण। समस्तांसि कर जोडून। विनंती पूर्ण मांडिली ॥ ४५ ॥ हे श्रुत न करावें ब्राह्मणांसी। म्हणोनि प्रार्थना करी सर्वांसी। मग सर्वत्रांनीं मानसीं। गुप्त पोटींसी ठेविलें ॥४६॥ आप्तवर्ग सुहृज्जन। सर्वत्र येक मुख होऊन। गुप्त ठेविलें वचन। प्रगट जाण होऊं नेदिती ॥ ४७ ॥ ब्राह्मणीं केलें स्नान। संध्या तर्पण देवतार्चन। तव आली मातंगीण। येवोनि अत्र गंगातीरा ॥४८॥ ब्राह्मणांजवळी बैसोनि। आहार स्वीकारी मातंगिणी। ब्राह्मण म्हणती हे चांडाळिणी। निर्भ-र्त्सूनि दवडिली ॥ ४९ ॥ ते बोलिली ब्राह्मणांसी। येकोबानें वाढिलें आम्हांसी। पितर होवोनि गेलों गृहासी। त्यानें सर्वांसी तृप्त केलें ॥ ५० ॥ तुम्हीं जावें भोजनासी। सिद्ध जाहले पाकासी। गंगातीरीं सावकाशीं। आहारासी भक्षूं पा ॥ ५१ ॥ आजि आम्हीं येकनाथाचे पितर। तुम्हीं कां दटावितां निकरें। गंगातीरीं कल्पूं आहार। म्हणोनि साचार आले मी ॥ ५२ ॥ ऐकोनि तिचें वचन। थकित जाहले ब्राह्मण। येकनाथ येवढा सज्ञान। अविधी पूर्ण आचरला ॥ ५३ ॥ जळो जळो त्याचें ज्ञान। न होतां पिंडप्रदान। न होतां ब्रह्म भोजन। अंत्यज जन जेंवविले ॥५४॥ येक होवोनि अवघे जन। स्वयें बोलती ब्राह्मण। आतां न करावें पिंड तर्पण। कोणी भोजन न करावें ॥ ५५ ॥ येकनाथाचीं पितृतिथी। ब्राह्मणां येकादशीं निश्चिती। ऐसें

१ स्वयपाक करण्यास्या मंडळींनीं

ब्राह्मण जल्पती । अनेक बोलती अनेक ॥ ५६ ॥ येक म्हणती करावें दंडण । येक म्हणती करावें मुंडण । जानवें टाका तोडून । म्हणती संपूर्ण पैं येक ॥ ५७ ॥ येक म्हणती मारावा धरून । शिक्षा लावावी संपूर्ण । येक म्हणती नलगे दंडण । शिखा उपडून हातीं द्यावी ॥ ५८ ॥ येक म्हणती प्रायश्चित्त । देवोनि शुद्ध करा त्यातें । नाश होईल त्याचे प्रस्थ । न करावें व्यर्थ सर्वदा ॥ ५९ ॥ येक म्हणती चांडाळ जन । आधीं जेविलें संपूर्ण । त्यांचें उचिष्ट उरलें अन्न । सर्वथा ब्राह्मण न जेविती ॥ ६० ॥ तंव एकनाथाचे ब्राह्मण । भोजना पाचारू आले आपण । अवघे चला करूनी स्नान । पाक संपूर्ण सिद्ध जाला ॥ ६१ ॥ व्हावे लागती कर्मविधी । दर्भ घेउनी चला आधीं । सर्व केली साहित्य सिद्धी । चला त्रिशुद्धी वेळ नाहीं ॥ ६२ ॥ ब्राह्मण म्हणती तयासी । जाऊनि सांग येकनाथासी । पाचारुनि अंत्यजासी । पिंड पितरांसी अर्पावा ॥ ६३ ॥ अन्न अर्पुनी चांडाळ जना । आतां पाचारिसी ब्राह्मणा । अवघे मिळोनि ब्राह्मण जना । करिती ताडणा स्वहस्तें ॥ ६४ ॥ अवघे मिळोनि ब्राह्मण । स्वयें केलें ताडण । येरी मांडिलें शंख स्फुरण । आले जाण गृहासी ॥ ६५ ॥ करीत आले रुदन । वृत्तांत सांगीतला संपूर्ण । जेऊं घातले हीन जन । कळलें जाण ब्राह्मणांसी ॥ ६६ ॥ जयांसी केला अन्नधर्म । त्यांचे हातीं चालवा कर्म । बुडविला स्वयें स्वधर्म । हे ब्राह्मणोत्तम

बोलिले ॥ ६७ ॥ अवघा ब्राह्मण मिळोन । मज केले ताडण । ब्राह्मण सर्वथा न येती जाण । काय करणें स्वामिया ॥ ६८ ॥ ऐकोनि द्विजाचें वचन । येकनाथ हासिले पूर्ण । ब्राह्मण केवल नारायण । त्यांचें ताडण वंद्य आम्हां ॥ ६९ ॥ ब्राह्मणी ताडिले संपूर्ण । म्हणोनि खेद न करावा आपण । त्यांसी घालोनि लोटांगण । आणीक संपूर्ण पाचारी ॥ ७० ॥ स्वामी आज्ञा वंदूनि शिरीं । ब्राह्मण पातला गंगातिरीं । ब्राह्मण देखोनि दुरी । नमन करी साष्टांग ॥ ७१ ॥ येकनाथें वंदोनि जाणा । पाचारिलें सर्व ब्राह्मणा । दीनांवरी करुनी करुणा । ऐसें भापण बोलिले ॥ ७२ ॥ ब्राह्मण म्हणती न येऊं सर्वथा । ऐसेंचि सांग येकनाथा । ब्राह्मण परतला मागुता । ताडण तत्वता करतील ॥ ७३ ॥ येउनी सांगे आपण । सर्वथा न येती ब्राह्मण । आतां सोडोनि ब्रह्मार्पण । करूं भोजन सकळिक ॥ ७४ ॥ ऐकोनिया त्याच्या वचना । हृदयीं आठविलें जनार्दना । ब्राह्मणीं मांडिली छळणा । काय जगजीवना करावें ॥ ७५ ॥ मग उभा राहोनी देवतार्चनीं । पितर पाचारिले हाक देवोनी । गृहामाजी अंगणीं । जाली दाटणी पितरांची ॥ ७६ ॥ सूर्याचेनि प्रकाशांत । प्रकाशमान देखिला पिता । साष्टांग प्रणिपाता । करी तत्वता एकनाथ ॥ ७७ ॥ वंदिली रुक्मिणी माता । म्हणे ये रे बा तूं सुता । मातेची निज माता । ते ही तत्वता वंदिली ॥ ७८ ॥ पित्याचा पिता चक्रपाणी । येका पातला लोटांगणीं । चुलता चुलती

यंधू यहिणी । त्या लागूनी वंदिलें ॥ ७९ ॥ चक्रपाणीचा पिता । भानुदास देखिले अवचिता । आलिंगोनी येकात्मता । चरणीं तत्वतः वंदिलें ॥ ८० ॥ ऐसें किती सांगावें भिन्न भिन्न । आले बेचाळीस पितृगण । येकमेकां नाहीं खुण । असंख्य जाण मिळाले ॥ ८१ ॥ पितर देखोनी जिवंत । आश्चर्य करिती समस्त । धन्य धन्य येकनाथ । स्वयें वंशांत जन्मला ॥ ८२ ॥ करोनि चरण क्षाळण । सारिखें करोनि पूजन । समस्त आपले पितृगण । पूजिले जाण ॥ ८३ ॥ मोहपर्णे सुवर्ण पात्र । त्यामाजी जेविती सकळ पितर । मोह पात्रींचें अन्न पवित्र । जेविती स्वतंत्र पितृगण ॥ ८४ ॥ ग्रासोग्रासी ब्रह्मार्पण । पितर बोलती आपण । येकनाथ वाढी अन्न । प्रार्थना संपूर्ण करोनि ॥ ८५ ॥ येकनाथाचिया घरीं । जिवंत पितर जेविती निर्धारीं । हें वाक्य परस्परीं । श्रवणीं द्विजवरीं ऐकिलें ॥ ८६ ॥ राउळांगणीं पातले ब्राह्मण । घरांत जेविती पितृगण । उभे राहोनी येक क्षण । कवतूक जाण पाहिलें ॥ ८७ ॥ जे जे आले भोजनासी । पूर्विलें वोळखी वळखूनि त्यांसी । ब्राह्मण पावले विस्मयासी । बोलता बोलासी न बोलवे ॥ ८८ ॥ जालिया पितरांचें भोजन । तेचि स्थळीं आंचविती पूर्ण । तांबूल दक्षिणा देवोन । तयेचि जाण बोळविले ॥ ८९ ॥ घरांतचि निर्माण जाले । घरांतचि जेविलें । घरांतचि आंचवलें । अदृश्य जाले घरांत ॥ ९० ॥ उच्छिष्ट पात्रें सर्वांतें । दाखविलीं येकनाथें । आमचे पितर

येउनी येथें । जेविले निश्चित स्वानंदें ॥ ९१ ॥ उच्छिष्ट पात्रीं येकनाथ । स्वयें जाला लोळत । जाला द्विजांचा गर्व हत । राहिले तटस्थ होवोनी ॥ ९२ ॥ बाहीर येउनी येकनाथ । करी ब्राह्मणांसी दंडवत । स्वामींनीं कृपा करोनि येथ । यावें निश्चित भोजना ॥ ९३ ॥ सन्मुख देखोनी येकनाथ । ब्राह्मण सर्व आलिंगित । पितर जेवविले साक्षात । तुझा पुरुपार्थ अगम्य ॥ ९४ ॥ धन्य तुझा पुरुपार्थ । धन्य धन्य तुझा भावार्थ । धन्य तुझा भजन पंथ । धन्य गुरुभक्त तूं येक ॥ ९५ ॥ धन्य धन्य तुझें ज्ञान । तूं अखंड सावधान । म्हणोनि देति आलिंगन । समाधान ब्राह्मणा ॥ ९६ ॥ मग येकनाथ आणि ब्राह्मण । सावकाश करिती भोजन । येकनाथाचें स्वयें गुण । ब्राह्मण आपण वर्णिती ॥ ९७ ॥ करोनिया भोजना । तांबूल आणि दक्षिणा । अर्पूनिया ब्राह्मणा । मस्तक चरणांवरी ठेविलें ॥९८॥ आज्ञा घेवोनि निश्चिती । ब्राह्मण गेले निजपंथीं । येकनाथाची महिमा अद्भुती । अतर्क्य निश्चिती विधिवदा[१] ॥ ९९ ॥ हें प्रतिष्ठान चरित्र गोकुळ । कृष्णाष्टमी केवळ । पितृ स्वरूपी खेळ । स्वानंद मेळ जनार्दन ॥ १०० ॥ म्हणे कृष्णदास

१ ब्रह्मदेवालाही सांगण्यास.

जगदानंद । नंदन श्रीनाथ पदारविंद । सेवोनि चरण मकरंद । सच्चिदानंद स्वयें जाला ॥ १०१ ॥ इति श्री प्रतिष्ठान चरित्रे अष्टमोध्यायः ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

॥ श्रीउद्धवार्पणमस्तु ॥

## अध्याय ९ वा

[ जनार्दनस्वामींची पुण्यतिथि—उत्सवाची सिद्धता—दहा सहस्र ब्राह्मणांना भोजनास निमंत्रण—आयत्यावेळीं तुपाकडून खोटी—तूप गांवांत विकत मिळत नाहीं—ब्राह्मणांचा असंतोष—एकनाथस्वामी आडांतून पाणी काढतात, त्याचें तूप होतें—ब्राह्मणाचें भोजन—गांव भोजन—हरिकीर्तनाचा समारंभ—एकनाथस्वामींना भगवन् पीतांबराचें दर्शन. ]

श्रीमंगलमूर्ति, प्रसन्न ॥ येकनाथ चरण रज । माथा वंदितांचि सहज । डोळ्यांत[1] येऊनि बैसलें निज । दिसे अधोक्षज दृश्य मात्रीं ॥ १ ॥ त्याचीया कृपेचा स्वभाव । दृश्य व्यक्ती दिसे देव । द्रष्टा देवाचा आदिदेव । दरुपण स्वयमेव देवरूप ॥ २ ॥ दृश्य द्रष्टा दर्शन । धरावें त्रिपुटीचें ध्यान । ते त्रिपुटी मावळली जाण । सहज ध्यान सुटलें ॥ ३ ॥ ध्यान जालें वाउगें । उरलेपण[2] आंगील मुग । धरूनि मुगीपणाचें आंग । भक्त सर्वांग वर्तती ॥ ४ ॥ सांडून लावी जाणीव नेणिव । भक्त वर्तती निजानुभव । हे येकनाथ कृपेचें वैभव । पूर्णत्वें गौरवें विराजती ॥ ५ ॥ हें पूर्णत्वाचें पूर्णपण । शिष्यासी सद्गुरूचें भजन । त्या भजनाचें महिमान । संत सज्जन जाणती ॥ ६ ॥ पावले पूर्णत्वाची प्राप्ती । जनार्दन हरपले पूर्ण स्थिती । त्यांची करावी पुण्यतिथी । अत्यंत प्रीती

---

१ डोळ्यांत आत्मरूप येऊन बसलें.

२ ध्यान व्यर्थ झाल्यावर द्रष्टा जो वेगळेपणानें उरतो त्याला मुंगीसारखा सूक्ष्मपणा आलेला असतो आणि अशा सूक्ष्मपणानें भक्त राहतात, असा आशय.

येकनाथा ॥ ७ ॥ फाल्गुन वद्य षष्ठी । तद्दिनीं पुण्यतिथि गोमटी । येकनाथासी आनंद कोटी । साहित्य उठाउठी करविलें ॥ ८ ॥ येकनाथाचें प्रेम । ब्राह्मण भोजनाचें संभ्रम । भोजन द्यावें उत्तमोत्तम । अति सप्रेम स्वानंदें ॥ ९ ॥ ब्राह्मणासी प्रिय भोजन । षड्रस पक्वान्न घृत पूर्ण । स्वयें करावें ब्रह्मार्पण । तेणें जनार्दन तृप्त होय ॥ १० ॥ स्वामीचा आजि पुण्य दिवस । म्हणोनि प्रकाशिला उल्हास । गुरुभक्तीचा विलास । दावी सुरस येकनाथ ॥ ११ ॥ सहज येकनाथाचा स्वभावो । सर्वांठायीं भगवत्भावो । पुण्यतिथीचा नवलावो । स्वानद पाहो कोंदाटे ॥ १२ ॥ पदोपदीं उत्साहो । सर्वांगीं नाचे ब्रह्मभावो । आपण परब्रह्म स्वयमेवो । पूर्णानुभवो विराजत ॥ १३ ॥ आपण परब्रह्म केवळ । ब्रह्मार्पणीं भजनशीळ । ब्रह्मपदींच स्वयें लोळे । ब्रह्मीं खेळे ब्रह्म होवोनी ॥ १४ ॥ म्हणोनि पदोपदीं भजन । सर्वाभूतीं अभिवंदन । नयनीं कोंदला जनार्दन । म्हणूनि अभिन्न भजन वाढे ॥ १५ ॥ त्या जनार्दनाची तिथी । येका आरंभी अतिमीति । आचंतणा[१] केली निर्मुक्ति । जे जे येती भोजना ॥ १६ ॥ दहा सहस्राची पंक्ति । स्वयें बैसले ब्रह्ममूर्ति । वेद गायन आरंभिती । पुराणें पढती पुराणिक ॥ १७ ॥ हरिभक्ती हरिकीर्तन । येक करिती देवतार्चन । वेदशास्त्रसंपन्न ब्राह्मण । शास्त्रज्ञान सांगती ॥ १८ ॥ बैसूनिया संत जन । बोलती परमार्थ बोलणें । ब्रह्मज्ञानाचेनि

१ मुक्तद्वार आमंत्रण दिलें.

स्फुंदन । आनंद जीवन नेत्रीं गळे ॥ १९ ॥ ऐशा ठायीं आनंद पूर्ण । आनदे क्रीडे जनार्दन । अपार बैसले ब्राह्मण । येकनाथ पूजन आरंभिलें ॥ २० ॥ भूदेवांचें देवतार्चन । येका आरंभी आपण । पोडशोपचार पूजन । यथा योग्य जाण मांडिलें ॥ २१ ॥ ब्राह्मणांचें चरण क्षाळण । ठायींचेठायीं करिती जाण । गंधाक्षता कुंकुम पूर्ण । ब्रह्मार्पण अर्पिती ॥२२॥ कर्पूरयुक्त चंदन । सर्वांगीं चर्चिती आपण । तुळशी माळा ब्रह्मार्पण । कंठीं जाण सर्वांच्या ॥ २३ ॥ जाई जुई शेवंती माळ । तेही अर्पिली तात्काळ । सर्वांगीं बुका उधळ । आनंद कल्लोळ पूजेचा ॥ २४ ॥ ब्राह्मण सन्मुख जाण । मृदंग टाळ हरिकीर्तन । धूप दीप ब्रह्मार्पण । करी संपूर्ण येकनाथ ॥२५॥ खाद्य नैवेद्य नीराजन । आरत्या उजळती आनंदघन । ब्राह्मण तोषविले पूर्ण । लोटांगण घालितु ॥ २६ ॥ स्वस्थ बैसले ब्राह्मण । आतां आरंभिती भोजन । पाकसिद्धीचें पूजन । करी संपूर्ण येकनाथ ॥ २७ ॥ येकनाथ पूजेची गोडी । अन्नपूर्णेसी परमावडी । धावत आली लवडसवडी । प्रवेशली गाढी अन्नांत ॥ २८ ॥ अन्नपूर्णा प्रवेशली अभ्रांत । वाढले अन्नाचे पर्वत । सानंद गोडी मघमघित । वोसंडत अन्नपूर्णा ॥ २९ ॥ पात्रें घालोनिया जाण । स्वयें वाढिती ब्राह्मण । घृत साहित्य संपूर्ण । आणुमात्र जाण असेना ॥ ३० ॥ आणुमात्र नाहीं घृत । घाबिरे जाले सुहृद गोत । जळो याचें साहित्य । भोजनीं मुख्य तेंचि नाहीं ॥ ३१ ॥ येकनाथापाशीं येऊन । बोलते जाले

सुहृज्जन । गुरुभजनीं जाला निमग्न । घृताचें स्मरण तुम्हां नाहीं ॥ ३२ ॥ आम्हीं कल्पिलें होतें चित्तीं । घृत साहित्य येकनाथीं । केलें असेल सुनिश्चिती । तव ते येथें दिसेना ॥३३॥ असंख्य बैसली ब्रह्मपंक्ति । वाढणें होतें आलें समाप्ति । घृत वाढण्याची गती । काय निश्चिती पैं केली ॥ ३४ ॥ नासिका-विण मुख कमळ । तैसें घृताविणे प्रस्थ केवळ । घृत न वाढितां सकळ । ब्राह्मण प्रबळ क्षोभती ॥ ३५ ॥ येकनाथ म्हणे समस्तां । विसरलों घृताच्या साहित्य । स्मरण न जालें सर्वथा । कैसें आतां करावें ॥३६॥ चला शोध घ्या नगरांत । रोकडे द्रव्य घ्या हातांत । मिळवोनि शीघ्र आणा घृत । येकनाथें आज्ञापिलें ॥३७॥ स्थिर करा वाढावाढी । आहे घृताची वोढी । नगरांत धांडिलें लवडसवडी । जाली तातडी सकळिकां ॥ ३८ ॥ द्रव्य घेवोनि हातीं । असंख्य घरोघरीं फिरती । रोकडे द्रव्य देवोनि हातीं । घृत निश्चिती आम्हां द्यावें ॥ ३९ ॥ आजि येकनाथाचें प्रस्थ । अन्नशुद्धीसी नाहीं घृत । कृपा करोनि समस्त । घृत निश्चित आम्हां द्यावें ॥ ४० ॥ हें ऐकोनिया उत्तर । कोण्ही नेदिति प्रत्योत्तर । नगरीं शोध केला फार । घृत साचार मिळेना ॥ ४१ ॥ मार्गीं बोलती समस्त । आजिचें मंदावलें प्रस्थ । केलें समग्र जालें व्यर्थ । गेलें सत्व येकनाथाचें ॥ ४२ ॥ जैशा नगरीचिया आळी । तैशा ब्राह्मणांच्या बोली । व्हावी घृताची सुकाळी । परि ते नवाळी राहिली ॥ ४३ ॥ येउनी सांगती येकनाथातें । स्वामिया न मिळे कोठें घृत । तुळसीदळ

अर्पोनि पात्र । सोडा निश्चित ब्रह्मार्पण ॥ ४४ ॥ सर्वथा न मिळे घृत । ब्राह्मण गजबजले निश्चित । हें काय केलें येकनार्थे । घृत साहित्य विसरला ॥ ४५ ॥ नाहीं घृताचें साहित्य । तरि कां आजि केला प्रस्थ । घृताची वाट पाहत । बैसले तटस्त सर्वही ॥ ४६ ॥ घृताविण भोजन । सर्वथा न करिती ब्राह्मण । येकमेकाचे पाहत वदन । तटस्थ संपूर्ण बैसले ॥ ४७ ॥ येक म्हणती ब्राह्मण । घृताविणें भोजन । तें वांझेचें मैथुन । फळतें जाण असेना ॥ ४८ ॥ येक बोलती गुह्य गोष्टी । गुरू प्रसाद मानोनी पोटीं । याचि भोजनीं तुष्टि पुष्टी । होवोनि उठाउठी गृहा जाऊं ॥ ४९ ॥ येक म्हणती ब्राह्मण । बांधुनी नेऊं हें अन्न । गृहा जाउनी संपूर्ण । घृतयुक्त भोजन आम्हीं करूं ॥ ५० ॥ येक म्हणती जळो तें घृत । आम्हां क्षुधा लागली बहुत । स्वयें भक्षोनि अन्नातें । होवोनी तृप्त ऐसेंचि जाऊं ॥५१॥ येक हटनिग्रही ब्राह्मण । म्हणे घृतयुक्त करूं भोजन । नातरी तीनी उपोषण । येथेंचि जाण स्वयें करूं ॥ ५२ ॥ येक ब्राह्मण बोलत । क्षुधा लागली वाढी घृत । नातरी देउनी शापातें । जाऊं निश्चिती उपवासी ॥ ५३ ॥ येक बोलती ब्राह्मण । शास्त्र संपन्न परायण । मृत पितर जेवविलें जेणें । तो घृत संपूर्ण वाढील आम्हां ॥ ५४ ॥ येक ब्राह्मण दटावित । वाढी वाढी रे वेगीं घृत । ब्रह्मार्पण सोडी निश्चित । का तटस्त केले आम्हां ॥ ५५ ॥ येका न सोडी ब्रह्मार्पण । ब्राह्मण न करिती भोजन । मग हृदयीं स्मरोनि जनार्दन । केलें विदाग्य

अवधारा ॥ ५६ ॥ पोहरा धरोनि हाता । आडि राहिला येकनाथा । ब्राह्मण कौतुक पाहतां । अवघे तटस्थ राहिले ॥ ५७ ॥ जय जय जनार्दन म्हणून । विहीरींत पोहरा सोडून । धरितां जनार्दनाचें ध्यान । जळ संपूर्ण घृत जालें ॥ ५८ ॥ आप होता तो नारायण । तो घृत जाला आपण । जनार्दनें आपुल्या स्मरणें । घृत आपण होवोनि ठेला ॥ ५९ ॥ वोढोनि पोहरा काढित । तव देखती दिव्य घृत । विस्मित जाले समस्त । धन्य हे येकनाथ साधू ॥ ६० ॥ पाण्याचें जालें स्वयें घृत । ऐसा त्याचा शुद्ध भावार्थ । मग ब्राह्मण बैसले निवांत । आनंदयुक्त भोजना ॥ ६१ ॥ पाण्याचें केलें तूप । ब्राह्मणा वाढिलें अमूप । येकनाथ तो कुलदीप । चित्स्वरूप निज साधू ॥ ६२ ॥ आला तुपाचा सुकाळ । उत्कृष्ट वाढितां जैसें जळ । ब्राह्मणांसी हर्ष कल्लोळ । जेविती प्रबळ स्वइच्छा ॥ ६३ ॥ स्वइच्छा ब्राह्मण घृत भक्षिती । द्रोण उचलोनि पिती । उदक टाकोनि पात्रें भरिती । मग नेती गृहासी ॥ ६४ ॥ तृषा लागल्या पूर्ण । घृतचि करिती प्राशन । घेऊं विसरले अन्न । घृतचि परी पूर्ण तृप्त जाले ॥ ६५ ॥ सुस्वाद मघमघीत । तृप्ती उथळली इत्थंभूत । तरी द्विजांचें मन धावत । आणिक घृत भक्षावें ॥ ६६ ॥ ऐसें आनंदे परिपूर्ण । जालें ब्राह्मणांचें भोजन । मग उच्छिष्टामाजि लोळण । केलें संपूर्ण येकनाथें ॥ ६७ ॥ ब्राह्मणाच्या उच्छिष्टांत । लोळे स्वयें येकनाथ । आणखी भावार्थी जे जाणते । ते ही लोळत

उच्छिष्टामाजी ॥ ६८ ॥ ब्राह्मण उच्छिष्ट समर्थ। त्यासि लागला कृष्णाचा हात। पांडवा घरीं जगन्नाथ। उच्छिष्ट काढित स्वहस्तकीं ॥ ६९ ॥ म्हणूनि टाकोनि थोरपण। उच्छिष्टीं लोळती ते थोर ब्राह्मण। राजद्वारीं ज्यांसी सन्मान। ते उच्छिष्ठामाजी संपूर्ण लोळती ॥ ७० ॥ सन्मान बहुमान गेले दिवस। लागला विषयांचा ध्यास। जळो आमुचा बुद्धीभ्रंश। विन्मुख भजनास पैं जालों ॥ ७१ ॥ ह्या येकनाथाचेनि योगें। उच्छिष्टावरूं सर्वांगें। प्रतिष्ठा ठेवोनि मागें। लागवेगें लोळती ॥ ७२ ॥ उच्छिष्ठामाजी लोळती। येकमेका त्राकोल्या दाविती। कृष्ण चरित्र मुखीं गाती। मग नाचती सर्वस्वें ॥ ७३ ॥ टाळ मृदगाचेनि घोळे। हारिखे नाचती गोपाळ। घेउनी उच्छिष्ठाचा कवळ। मारिति प्रबळ येकमेका ॥ ७४ ॥ ऐसे खेळ खेळतां नाना परी। स्वयें पातले गगातिरीं। तेथें खेळोनि हुंबरी। स्नान निर्धारीं आरंभिलें ॥ ७५ ॥ मगकरोनिया स्नान। येकनाथ आले आपण। झाले सडा संमार्जन। पंक्ति संपूर्ण वैसाव्या ॥ ७६ ॥ तांबूल आणि दक्षिणा। देवोनि बोळविलें ब्राह्मणा। करीत येकनाथाची वर्णना। गेले जाणा स्वाश्रमा ॥ ७७ ॥ येकनाथाचिया पंक्ति। वैसल्या जे असंख्य ब्रह्ममूर्ति। व्यापारी प्रतिष्ठित अतिरथी। ते ही पंक्ति वैसले ॥ ७८ ॥ चाटी भाटी तांबोळी। पाचारिले उदमी साळी। जे अहेति ब्राह्मणा मेळी। ते समूळी पाचारिले ॥ ७९ ॥ नगरामाजी केवळ। कोण्ही आसले रांड दुर्बळ।

खंगले भगले प्रबळ। सांभाळून समूळ आणावे ॥ ८० ॥ नगरामाजि लहान थोर। भोजना आणले सत्वर। येकनाथ पंक्ति साचार। तृप्त अपार पैं जाली ॥ ८१ ॥ जालें येकनाथाचें भोजन। तांबूल घेतले संपूर्ण। निशी काळीं हरिकीर्तन। आरंभिलें जाण स्नानंदें ॥ ८२ ॥ आजि समर्थांचा पुण्य दिवस। बोलाऊनि आणावे हरिचे दास। करावा कीर्तनाचा घोष। तेणें जगदीश सुखावे ॥ ८३ ॥ अनेक वाद्यांचिया ध्वनी। हरिभक्त आणिले गौरवोनी। सभा घणघटली पूर्णपणीं। जाली दाटणी श्रोतयांची ॥ ८४ ॥ सुवास बुका सुमन माळा। तुळसी हार कोमळ दळा। घालोनि हरिदासाच्या गळा। चरण कमळा वंदिलें ॥ ८५ ॥ नमन करितो चरणासी। उभे ठेले हरिकीर्तनासी। हरिभक्त संतोष मानसी। आरंभ कथेसी पैं केला ॥ ८६ ॥ हरिची नाना चरित्र लीळा। हरिभक्त वर्णिती वेळो वेळा। हरिनामाच्या गदारोळा। मृदंग टाळा अतिघोषे ॥ ८७ ॥ टाळ घोळ मृदंग भेरी। तो नाद न माये अंबरीं। हरिनामाच्या निज गजरी। गर्जवी वैखरी श्रोतयांची ॥ ८८ ॥ हातीं टाळी मुखीं नाम। हरिदासाचा तो कुळधर्म। आणि संतांचें निजधाम। पावन नाम हरीचें ॥८९॥ मुमुक्षाचें मोक्ष सुख। श्रीहरीचे नाम देख। नामावाचोनि

आणिक । जगीं तारक असेना ॥ ९० ॥ हरिनामाच्या परिपाटी । ठाणीं वैसलीं वैकुंठीं । हरिभक्ताची जाली दाटी । धन्य सृष्टी हरिनाम ॥ ९१ ॥ हातीं वाजवितां टाळी । पातकें जळोनि जाली होळी । मुखीं गर्जतां नामावळी । हरी जवळी येवोनि उभा ॥ ९२ ॥ जंव जंव नाम गरजे वाचे । तंव तंव ब्रह्म सुख पुढें नाचे । ब्रह्म कैवल्य सुखाचें । माहेर साचें हरिनाम ॥ ९३ ॥ जेथें हरिनामाचा गजर । तेथें हा तिष्ठे निरंतर । ऐसें ऐकतां उत्तर । तंव पीतांबर झळकला ॥ ९४ ॥ तेचि श्रीकृष्णाचें येणें । कीर्तनीं करी जागरण । दुजया गोचर नव्हे जाण । येकनाथा ह्मण वाणली ॥ ९५ ॥ झळकला पीतांबर पिवळा । येकनाथ वंदी चरण कमळा । अदृश्य देखोनि उतावेळा । समाधि सोहळा सुख भोगी ॥ ९६ ॥ हरिकीर्तनी तिष्ठे हरी । हें ऐकताचि निर्धारी । येकनाथाच्या दृष्टिभरी । तेजें पितांबर झळकला ॥ ९७ ॥ जाला कांहीं चमत्कार । सर्वांसी भास जाला थोर । मग करोनि नमस्कार । वैसले साचार हरिकीर्तना ॥ ९८ ॥ हरिकीर्तनींच आला कृष्ण । प्रभात जालीया पूर्ण । होवोनि दीन ब्राह्मण । द्वारीं आपण राहिले ॥ ९९ ॥ तेथेंचि कुसरी । श्रवण कीजे परम चतुरीं । ब्राह्मण वेषें श्रीहरी । राहिले द्वारीं भक्तिसुखा ॥ १०० ॥

हें प्रतिष्ठान चरित्र आत्माराम । जन्मोजन्मीचा संभ्रम । नवमाध्यायी पुरुषोत्तम । आले भक्तिप्रेम सेवावया ॥ १०१ ॥ म्हणे कृष्णदास जगदानंद । नंदन श्रीनाथ पदारविंद । सेवोनि चरण मकरंद । सच्चिदानंद स्वयें जाला ॥ १०२ ॥ इति श्री प्रतिष्ठान चरित्रे नवमोध्यायः ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

॥ श्रीउद्धवार्पणमस्तु ॥



॥ ऑव्या ॥

श्रीहरीचे श्रीचरण । तें माझें जन्मस्थान ।
गौतमी उल्हासली जाण । मस्तकीं चरण वंदिले ॥
स्नान केलें कृष्णनाथें । गौतमी आनंदली चित्तें ।
सर्वांगीं झाली पुनित । सकळ पापातें निर्दाळिली ॥



॥ ऑव्या ॥

दोनीकडे दोनी कुंभ । भरोनि कावडी स्वयंभ ।
त्वरा करी पद्मनाभ । जाला विलंब उदकासी ॥
उदक आणोनि पूर्ण । स्वयें भरतसे राजण ।
आतबाहेर उदक पूर्ण । करी श्रीकृष्ण सर्वदा ॥

[ ओंव्या ७५–७६ — ' प्रतिष्ठान–चरित्र ', अध्याय १० – ओंव्या ८२–८३ ]

## अध्याय १० वा

[ एकनाथस्वामींच्या दारांत एक ब्राह्मण उभा—एकनाथस्वामी त्याला भेटतात—तो त्याचे घरीं सेवेस राहण्याची इच्छा करतो—एकनाथस्वामी ती मान्य करतात—ब्राह्मणानें केलेली सेवा – त्याला श्रीखंड्या हें नांव मिळतें. ]

श्रीगणेशायनमः ॥ धन्य धन्य तें प्रतिष्ठान । धन्य येका जनार्दन । धन्य त्याचें अनुष्ठान । भक्ति महिमान दाविलें ॥ १ ॥ धन्य धन्य त्याची भक्ती । धन्य धन्य त्याची स्थिती । धन्य धन्य त्याची कीर्ती । त्रिजगतीं वानिजे ॥ २ ॥ धन्य धन्य त्याचा वास । धन्य धन्य त्याचा परमार्थविलास । धन्य त्याचा विश्वास । जगन्निवास पैं आला ॥ ३ ॥ त्रैलोकीचा आत्माराम । आवाप्त पूर्ण सकळ काम । जड उद्धरती ज्याचिया नामें । तो पुरुषोत्तम स्वयें आला ॥ ४ ॥ हरिकीर्तनीं तावोनि तेजें । अदृश्य जाला गरुडध्वज । पीतांबर झळकला तेजःपुंज । भानुतेज लोपलें ॥ ५ ॥ ज्याचेनि दैदीप्यमान । सूर्य जाला विराजमान । तेज प्रतापें जग संपूर्ण । वर्तती जाण स्वसत्ता ॥ ६ ॥ ऐसा श्रीकृष्ण तेजःपुंज । चतुर्भुज अधोक्षज । ऐश्या रूपें भक्तकाज । करितां लाज त्यासी काय ॥ ७ ॥ पांडवांचिया घरीं । रत्न मंडण कौस्तुभधारी । पीतांबर लोळे भुईवरी । जाला कामारी भक्ताचा ॥ ८ ॥ कानीं कुंडल मुक्त माळा । पीतांबर झळके सोनसळा । उचलोनि उच्छिष्ट पात्र कवळा । शृंगारी अवलीळा परत्या त्या ॥ ९ ॥ तैसेंचि येकनाथाचिया घरीं । दिव्य रूपें श्रीहरी । वर्तता भय

काय निर्धारी । वेशधारी मानवाचा ॥ १० ॥ जरी प्रगट येता श्रीकृष्ण । येकनाथ घालिता लोटांगण । वारंवार वंदिता चरण । परता येक क्षण नवजाता ॥ ११ ॥ षट्कर्माचें आचरण । येका करिता कृष्णार्पण । त्यास नाठवतें भोजन । कृष्ण दर्शन तृप्त होता ॥ १२ ॥ देव्हारा श्रीकृष्ण मूर्ती । वैसवोनि सुनिश्चिती । येकनाथ पूजिता अहोरात्रीं । स्वानंद गती उल्हास ॥ १३ ॥ असो येकनाथाची गोष्टी । दर्शना येईल सकळ सृष्टी । होईल जनाची फार दाटी । परम अटाटी नमनाची ॥ १४ ॥ सुंदर राजीवलोचन । येकनाथा घरीं आपण । म्हणोनि घालीत लोटांगण । जन संपूर्ण येईल ॥ १५ ॥ श्रीकृष्ण प्राप्ती कारण । येकांती घालोनि आसन । अष्टांग योग साधन । योगीश्वर जाण साधिती ॥ १६ ॥ त्यासी प्राप्ति नाहीं वेगीं । वृथा साधनीं शिणले योगी । कृष्ण सापडला भक्तिमार्गी । लागवेगीं येकनाथाच्या ॥ १७ ॥ येकनाथाच्या भक्तिसाठीं । देव आले उठाउठी । चला जाऊ अवघे भेटीं । सकळ सृष्टी धावेल ॥ १८ ॥ प्रगट देखोनि यदुनायक । धावतील वैकुंठीचे लोक । संत आणि सनकादिक । तेही निःशंक येतील ॥ १९ ॥ वाढेल थोर पल्लाळ । होईल आनंदाचा गोंधळ । म्हणोनि तो घननीळ । मानवी केवळ स्वयें जाला ॥ २० ॥ दिव्यरूप प्रगटता देवा । मग येकनाथाची न घडे सेवा । देव भुलला भक्तिभावा । मत्यसद्भावा स्वानंदें ॥ २१ ॥ मुगुट कुंडलें कौस्तुभमणी । स्वाधीन केले रुक्मिणी । म्हणे तूं जाई वैकुंठ-

भुवनीं। आम्ही ऋणी भक्तांचें ॥ २२ ॥ नवल भक्तीचे वोज। भाव भक्तिचेनि मोजें। आम्हांवरी केलें ओझें। तें सहज निस्तरावें ॥ २३ ॥ मुदल नाहीं देणें घेणें । त्याचे उगवून घेतलें. त्याणें। कळंतर[1] मात्र आम्हीं फेडणें । सेवा करून भक्ताची ॥ २४ ॥ कळंतर द्यावयासी । भांडवल नाहीं आम्हांपाशीं। यालागी जाऊन त्याचिया घरासी। जीव सर्वस्वेसीं विकावा ॥ २५ ॥ ते जें जें सांगतील काज। तें तें करावें सांडोनि लाज। तुवां वैकुंठीं असावें सहज। ऐसें गरुडध्वज सांगितलें ॥ २६ ॥ ऐसे सांगोनि रुक्मिणीसी। दिव्याभरणें अर्पुनी तीसी। आला येकनाथाच्या गृहासी। हृषीकेशी स्वानंद ॥२७॥ मुगुट ठेवोनि टोपी ल्याला। कस्तुरी त्यागूनि भस्म भाळा। पीतांबर त्यागूनि वहिला। अंगुस्तराला अंगीकारी ॥ २८ ॥ प्रावरण जालें अति जर्जर। येऊनि उभा दारासमोर । पाहोनि येकनाथाचें मंदिर । नमस्कार पैं केला ॥ २९ ॥ येकनाथाचे गुणानुवाद । उभा वर्णीत गोविंद। गोविंदाच्युत मुकुंद । परमानंद गातसे ॥ ३० ॥ तव येकनाथ आले बाहेरी। येरू नमन चरणासी करी। येकनाथे कल्पूनि हरी। नमन करी ब्राह्मणासी ॥ ३१ ॥ सहज याचा भगवद्भावो। सदा असे स्वयमेवो। ब्राह्मण प्रत्यक्ष भूदेवो। म्हणोनि नमन पाहो करीतसे ॥ ३२ ॥ येकनाथ पुसे ब्राह्मणास। कोणता स्वामींचा देश। कोठे आहे आपुला वास। परम उदास

[1] व्याज

दीसता ॥ ३३ ॥ पुढें कोठवरी आहे जाणें । अथवा या ग्रामीच राहणें । किंवा माघारें परतणें । हे स्वामीनें संपूर्ण सांगावें ॥ ३४ ॥ काय आपुलें नाम । कोण आपुला धाम । सकाम किंवा निष्काम । हे ब्राह्मणोत्तमें सांगावें ॥ ३५ ॥ ऐकोनि येकनाथाचें वचन । ब्राह्मण बोले आपण । आम्हां नाहीं स्थानमान । उदास पूर्ण पैं आम्हीं ॥ ३६ ॥ आम्हां नाहीं जननी जनक । पुत्र कलत्र सुहृल्लोक । मी स्वयें येकला येक । जाण निर्टंक येकनाथा ॥ ३७ ॥ येकला येक उदासपणें । स्वयें हिंडलों त्रिभुवन । परि अन्नवस्त्र देवून । कोणी ठेवोनि न घेती ॥ ३८ ॥ जन जाले अज्ञान । लागलें विषयाचें ध्यान । द्वारीं आलिया ब्राह्मण । सर्वथा जाण नोळखती ॥ ३९ ॥ प्रावरण जर्जर जालें सर्वथा । परि नाहीं मिळाला कोणी दाता । तुजवाचोनि येकनाथा । प्रतिपाळिता दिसेना ॥ ४० ॥ मी ब्राह्मण परम दीन । अखंडीत उदासीन । तुझे श्रीचरण सेऊन । सुखें असेन तुझ्या गृहीं ॥ ४१ ॥ ठाकेल ती करीन सेवा । पत्र पुष्पें आणीन देवा । गंधाक्षता अवंचक भावा । सकळही सेवा करीन ॥ ४२ ॥ जें न्यून पडेल जे समयीं । तें सिद्ध करीन पाही । अंतरीं दुजाभाव नाहीं । निज निश्चयीं जाण पा ॥ ४३ ॥ पृथ्वी हिंडतां देख । श्रम पावलों अति दुःख । तुझ्या दर्शनीं जालें सुख । आत्यंतिक स्वानंदें ॥ ४४ ॥ येकनाथा तुझ्या दर्शनीं । उघडली सुखाची खाणी । तूं पूर्ण सुखाचा दिनमणी । आनंद किरणीं विराजसी ॥ ४५ ॥

तुम्हां साधूची सेवा करणें । हें आम्हांसी परम भूषण । संत सेवेचें महिमान । अगम्य जाण तिहीं लोकीं ॥ ४६ ॥ जे साधूचि सेवा करिती । ते मोक्ष सुखासी पात्र होती । त्यापाशीं लक्ष्मीपती । अखंड निश्चिती उभा असे ॥ ४७ ॥ पूर्वपुण्य असल्या चोख । साधुसेवा घडेल देख । साधुसेवेचें ज्यासि सुख । त्यासी तिनी लोक वंदिती ॥ ४८ ॥ तुझ्या सेवेचें सुख । मज वाटे आत्यंतिक । हृदयीं आनंद दाटे देख । परम हरिख सेवेचा ॥ ४९ ॥ माझ्या अन्नवस्त्राचें संकट । तुज लागलें असेल दाट । तरी भिक्षाटण करोनि नेट । भरीन पोट स्वानंदें ॥ ५० ॥ परि करीन तुझी सेवा । हे परम आवडी माझिया जीवा । कृपा करावी कृपार्णवा । देवाधिदेवा तूं मान्य ॥ ५१ ॥ ऐकोनि ब्राह्मणाचें वचन । येकनाथासी आनंद पूर्ण । म्हणे हा भला ब्राह्मण । साधूचें चिन्ह या अंगीं ॥ ५२ ॥ भला ब्राह्मण सत्वगुणी । हा पाहिजे आम्हां लागोनि । मग येकनाथें आलिंगोनि । मंजुळ वचनीं बोलिले ॥ ५३ ॥ येकनाथ बोलें वचन । काय आपुले नामाभिधान । येरू म्हणे कृष्णंभट जाण । जन संपूर्ण पाचारी ॥ ५४ ॥ नांव ऐकोनि येकनाथ । संतोष पावले बहुत । मग तया ब्राह्मणातें । अभय देत स्वानंद ॥ ५५ ॥ येकनाथ म्हणे हें तुमचें घर । आम्हीं तुमचे आज्ञाधर । आपण आनंदें निर्भर । निरंतर वर्तावें ॥ ५६ ॥ आम्हीं आपणा सेवा सांगणें । हे आमुचें किंचिज्ज्ञान

आपुल्या उछाहें करील मन । तेंचि करणें सर्वार्थीं ॥ ५७ ॥ तुम्हीं भूदेव ब्राह्मण । आम्हीं तुमची सेवा करणें । तुम्हां पासोनि सेवा घेणें । अश्लाघ्य जाणें आम्हतें ॥ ५८ ॥ परी तुमचा आग्रहो फार । साधुसेवा निरंतर । करावी हा विचार । निज निर्धार दृढ केला ॥ ५९ ॥ आतां तुमचे मनोरथ । तुम्हींच पूर्ण करा निश्चित । तुम्हांस मानेल जें उचित । तेंचि निश्चित संपादावें ॥ ६० ॥ ऐकोनि येकनाथाचें वचन । संतोष पावला नारायण । धन्य साधू निराभिमान । सेव्य जाण आम्हांसी ॥ ६१ ॥ आतां भक्तिची सेवा । करणें दुर्लभ हेचि देवा । भक्तिसुखाचिया सुहावा । लाहो घ्यावा स्वानंदें ॥६२॥ म्हणोनिया तो ब्राह्मण । येकनाथासी करूनि नमन । वर्तूं लागला जाणून । स्वानंदघन उल्हासें ॥ ६३ ॥ प्रातःकाळीं उठोन । देवघराचें शुश्रूषण । उपकर्णिका साहित्य उजळोन । प्रक्षाळून ठेवीत ॥ ६४ ॥ सवेंचि पत्र पुष्पें आणोनि । स्वयें ठेवी देवतार्चनीं । मग झाडी फेडी करोनी । सडा संमार्जनी उद्युक्त ॥ ६५ ॥ देवघर माजघर । स्वयंपाकघर येकांत घर । संमार्जनीं अतिनिर्भर । दिव्य मंदिर शोभती ॥ ६६ ॥ शोभा दिसे राउळांगण । संमार्जनीं वृंदावन । रंगमाळा परिपूर्ण । दिसे भुवन वैकुंठीचें ॥ ६७ ॥ वैकुंठीची रचना । येकनाथाचिया भुवना । पाहतां भूलि पडे मना । वृत्ति जाणा स्थिर होय ॥ ६८ ॥ काया वाचा मन । सेवा करी नारायण । क्षणैक आंग चुकवूं नेणे । भक्तिनें जाण

कोंडला ॥ ६९ ॥ घेवोनि धोत्रांचें वोझें । गंगेसी जाय अधोक्षज । मळत्यागें शुद्ध सहज । जालें सुतेज धूतवास ॥ ७० ॥ तें आणोनि राउळांगणीं । वाळत घाली तत्क्षणीं । मग उदकालागीं सारंगपाणी । कावडी घेवोनि निघाला ॥ ७१ ॥ वळकट बांधोनी कावडी । खांदी वाहूनि आवडी । गंगेसी जाय लवडसवडी । अभिनव गोडी सेवेची ॥ ७२ ॥ कावडी ठेवोनिया गंगातीरीं । स्नानासी उदित श्रीहरी । गंगा उल्हासली अंतरीं । आला सर्वांतरी जगदात्मा ॥ ७३ ॥ जगदात्मा ब्रह्म परिपूर्ण । स्वयें करूं इच्छी स्नान । गौतमी हरखली जाण । देखोनि चरण हरीचे ॥७४॥ श्रीहरीचे श्रीचरण । ते माझें जन्मस्थान । गौतमी उल्हासली जाण । मस्तकीं चरण वंदिले ॥ ७५ ॥ स्नान केलें कृष्णनाथें । गौतमी आनंदली चित्तें । सर्वांगीं जाली पुनीत । सकळ पापातें निर्दाळिलें ॥७६॥ संग्रहा होतें जगत्पाप । ते आजि जालें निष्पाप । गंगा जाली चित्स्वरूप । भाग्य अमूप तिहीं लोकीं ॥७७॥ श्रीकृष्ण स्नानमात्रें गंगा । तात्काळ जाली चिद्गंगा । सकळ पातकें गेलीं भंगा । स्पर्शे श्रीरंगा होताची ॥ ७८ ॥ गंगा म्हणे मी निवाले । चरणोदकें स्वयें न्हाले । कृष्णाचें मी तीर्थ प्याले । धन्य जाले सर्वथा ॥ ७९ ॥ जळस्पर्शे स्नानकाळीं । बुडी देतांचि वनमाळी । तात्काळ गंगा जाली सोवळी । नव्हे वोवळी कल्पांतीं ॥ ८० ॥ दुर्लभ हरीचे चरण । स्पर्शें गंगा जाली पावन । श्रीकृष्ण होवोनि समाधान । भरिलें जीवन

कावडी ॥ ८१ ॥ दोनीकडे दोनी कुंभ । भरोनि कावडी स्वयंभ । त्वरा करी पद्मनाभ । जाला विलंब उदकासी ॥ ८२ ॥ उदक आणोनी पूर्ण । स्वयें भरीतसे रांजण । आंत बाहेर उदक पूर्ण । करी श्रीकृष्ण सर्वदा ॥ ८३ ॥ येकनाथ उठले स्नाना । सेवेसी तत्प्रिय कृष्णराणा । पात्र भरोनि उष्ण जीवन । देतसे स्नाना उल्हासे ॥ ८४ ॥ स्नानकाळीं मुष्टी मर्दन । कळिमळ धाकाडी[१] जगजीवन । तेणें त्रिविधतापाचें उपशमन । सहजचि जाण होतसे ॥ ८५ ॥ सिद्ध करी धूतवास । सर्वेचि ठेवी आसनास । भस्म आणि संध्येस । उदकपात्रास भरोनि ठेवी ॥ ८६ ॥ मग घेवोनि थोर सहाण । स्वयें उगाळी चंदन । गंध पात्रभरी आपण । उल्हासें संपूर्ण स्वानंदें ॥ ८७ ॥ अखंड उगाळी श्रीखंड । म्हणोनि श्रीखंड्या नांव प्रचंड । स्त्रियादि सेवक जन उदंड । करोनि थोतांड पाचारिती ॥ ८८ ॥ तेचि श्रीखंड्या म्हणवोनि नांव । पाचारिती जन आघवें । येऱ्हवीं हें श्रीखंड्या उत्तम नांव । श्रीखंड्या भाव ऐलीकडे ॥ ८९ ॥ सर्वांसी मोहन घातलें । श्रीकृष्ण हें अच्छादिलें । श्रीखंड्या नांव विख्यात जालें । लाघव केलें श्रीकृष्णें ॥९०॥ असो श्रीखंड्या तोचि श्रीकृष्ण । हे कृष्णाचि स्वयें आपण । येकनाथें देवतार्चन । आरंभिलें जाण सर्वथा ॥ ९१ ॥ येकनाथाचें देवतार्चन । अतिशयेंसी श्रेष्ठपूर्ण । शोधोनि पाहतां त्रिभुवन । ऐसें देवतार्चन असेना ॥ ९२ ॥ गंधाक्षता पत्र

१ नाहींसे करी.

पुष्प । संनिध ठेवी धूपदीप । नैवेद्य तांबूल अमूप । सिद्ध समीप येकनाथाच्या ॥ ९३ ॥ जे जे इच्छी येकनाथ । तेथें देतसे कृष्णनाथ । जालें देवतार्चन समाप्त । आतां ब्राह्मणांतें पूजावें ॥ ९४ ॥ ब्राम्हण पूजेचें कवतुक । येकनाथासि आत्यंतिक । घेतलें ब्राह्मणांचें चरणोदक । उपचारें देख पूजा केली ॥ ९५ ॥ जालीं सकाळचीं भोजनें । भोजनें जालें वृसजन । कृष्णासि ब्राह्मणांची प्रीती गहन । उच्छिष्ट काढोनि टाकित ॥ ९६ ॥ आतां सुरंग त्रिडे । श्रीरंग देतसे वाडे कोडें । तें निरूपण निवाडें । सहज पुढें सांगिजेल ॥ ९७ ॥ पुढील अध्यायीं निरूपण । एकतां निवे श्रोतयांचें मन । अज्ञान होतील ज्ञानघन । सावधान परिसतां ॥ ९८ ॥ हें प्रतिष्ठान चरित्र विजयी जाण । विजय दशमीचा उत्साह गहन । भक्तांघरीं नारायण । वाहे जीवन स्वानंदें ॥ ९९ ॥ म्हणे कृष्णदास जगदानंद । नंदन श्रीनाथ पदारविंद । सेवोनि चरण मकरंद । सच्चिदानंद स्वयें जाला ॥ १०० ॥ इति श्री प्रतिष्ठान चरित्रे दशमोध्यायः ॥ गोड हा ॥ संपूर्णोस्तु ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

॥ श्रीउद्धवार्पणमस्तु ॥

# अध्याय ११ वा

[ श्रीकृष्ण एकनाथस्वामींचे घरीं राहिले म्हणून रुक्मिणी मातेस पडलेली चिंता—श्रीकृष्णदर्शनाकरितां द्वारकेंत अनुष्ठान करणाऱ्या ब्राह्मणास दृष्टांत—सदर ब्राह्मण पैठणास येतो—एकनाथस्वामींची व ब्राह्मणाची भेट—श्रीखंड्या गुप्त होतो—ब्राह्मणाचें समाधान—ग्रंथसमाप्ति ]

श्रीगणेशाय नमः ॥ गुरूचे श्रीचरण । मस्तकीं वंदोनि परिपूर्ण । पुढील कथा निरूपण । सांगेन जाण श्रोतयां ॥१॥ जालिया सकळांचें भोजन । मग विडे घेतले संपूर्ण । येकनाथासी श्रीकृष्ण । विड्या करोनी देतसे ॥ २ ॥ श्रीकृष्ण हातीचा सेवितां विडा । येकनाथासी रंग गाढा । रंगीं रंगला चोखडा । स्वानंद विडा सुरंग ॥ ३ ॥ सबाह्य रंगलें मन । विश्व रंगलें चैतन्य घन । परिपक्व विडा परिपूर्ण । देतसे श्रीकृष्ण भक्तासी ॥ ४ ॥ मग बैसका घालोनि संपूर्ण । अवघे बैसले स्वस्थाना । काव्य कथा निरूपण । करिती व्याख्यान संस्कृताचें ॥५॥ तेथें आर्त श्रवणालागी । संत येती अनेगी । श्रीखंड कृष्णा त्यालागी । चर्ची सर्वांगीं निज उटी ॥ ६ ॥ उटीवरी मळयानिळ । विंझणा[1] हातीं घे घननीळ । संतांसी करी परम सीतळ । छेदी समूळ त्रिविध ताप ॥ ७ ॥ त्रिविध ताप निर्दळण । पूर्वीच केलें नारायणें । म्हणोनिया साधू संपन्न । सदा संपूर्ण सदोदित ॥ ८ ॥ येकनाथ तो सुख संपन्न । ज्यासी संरक्षी नारायण । नाठवे संसाराचें भान । सच्चिद्-

---

[1] पखा

भुवन विलसतु ॥ ९ ॥ ज्याचा संसाराचा भार। श्रीकृष्णें वाहिला अपार। म्हणूनि सुखाचा संसार। जाला साचार येकनाथासी ॥ १० ॥ बारा वरुषें पर्यंत। साक्षात् येवोनि श्रीकृष्णनाथ। संसाराचा भार वाहत। कोण भाग्यातें गणूं शके ॥११॥ कृष्ण हातीचें प्याला पाणी। कृष्णा हातें नाहला नाहणी। कृष्ण पंक्ति नित्य भोजनी। गोडपणी सुस्वाद ॥१२॥ कृष्ण घाली नित्य शेज। त्यावरी येकनाथ निजी निजे। चरण चुरी अधोक्षज। नवल चोज चोजवेना ॥ १३ ॥ श्रीकृष्ण आपुल्या बाहुदंडें। रूचें मर्दी श्रीखंड। येकनाथा चर्चि अखंड। भाग्य उदंड बोलावेना ॥ १४ ॥ सर्वांसि रुगेनि वाढावाढी। उचिष्ट पात्रें सर्वेचि काढी। गग करी झाडी फेडी। भीड गाढी भक्ताची ॥ १५ ॥ जित पितर जेवविले गृहांत। तेव्हां श्रीकृष्ण धरी त्या रूपातें। पितृ स्वरूपी जेवोनि अनंत। केला गर्व हत ब्राह्मणांचा ॥ १६ ॥ पाण्याचें करूनी घृत। तृप्त केले ब्राह्मण समस्त। परम कृपाळु भगवंत। न होय परते क्षणमात्र ॥ १७ ॥ जेथे उभा ठाके येकनाथ। पाठीसी श्रीकृष्ण उभा तिष्ठत। भक्तासी सोडोनी भगवंत। न होय परते क्षणमात्र ॥ १८ ॥ थोर भक्तीचा वडिवार। प्रेमांत गुंतला सारंगधर। कुमुदामाजी जेवि भ्रमर। आमोद सार सेवोनी असे ॥ १९ ॥ बाहीर जावया विसरले भ्रमर। रुंजी करीताति मनोहर। तैसा वैकुंठीचा सारंगधर। प्रेम भक्तीसी प्रेमभरें वेधला ॥'

जाऊं विसरला वैकुंठासी । अथवा जावें द्वारकेसी । हें ही विसरला हृषीकेशी ॥ २१ ॥ थोर चिंता करी रुक्मिणी। अजुनी न ये सारंगपाणी । खांद्यावरी वाहताती पाणी। लाज झणीं वाटेना ॥ २२ ॥ आपण त्रैलोक्य नायक। भक्ता द्यावें अक्षय सुख। हा टाकूनि लौकिक। जाले सेवक मोलाविणें ॥२३॥ बारा वरुषें जगजेठी। जीवन वाहतां जाले कष्टी। कोण सोडवील उठाउठी। पडिली संकटीं जगन्माता ॥ २४ ॥. मी उदंड पाहिले भक्त। बहूत हाटी हा येकनाथ। श्रीकृष्ण केला अंकित । जीवन वाहत तया घरीं ॥ २५ ॥ जळो तयाचें प्रेम। आमुचे अडकले पुरुषोत्तम। कांहीं येतील आत्माराम। विश्रामधाम जिवाचे ॥ २६ ॥ तंव येरकिडे द्वारकेंत। कृष्ण मागीस आलेंभूत। तपस्वी होता तप करीत । त्यासी दृष्टांत दिधला ॥ २७ ॥ अहोजी तपस्विमुनी । द्वारके नाहीं चक्रपाणी। नाहीं वैकुंठ भुवनीं। तीर्थस्थानि असेना ॥ २८ ॥ नाहीं यज्ञ हवनापाशीं। पाहता नातुडे योगाभ्यासी । शेष शय्या सुखासी। पाहतां हृषीकेशी तेथें नाहीं ॥ २९ ॥ तो आहे प्रतिष्ठानि । भक्ता घरीं वाहे पाणी। देव जाला भक्तारुणी । निश्चय मनीं जाण पा ॥ ३० ॥ तो कोण म्हणसी भक्त। परम साधू येकनाथ। भक्तिरहस्य प्रेमांत । सदोदित निमग्न ॥ ३१ ॥ नाठवें देहाचें देहपण। मना नाठवें मनपण। सदोदित वृत्ति शून्य। असुनी सावधान वर्ततु ॥३२॥ बाळपणीं तो गुरुभक्त जाणा । दाविलें भक्तीचें महिमान ।

मर्वांग अवंचक पूर्ण । अणुमात्र वंचन असेना ॥ ३३ ॥ गुरु संवेसी सावधान । सर्वांग करी मनाचे कान । गुरुमूर्ति पाहावया जाण । सर्वांग नयन होती ज्याचे ॥ ३४ ॥ न धरूनि देहाचें भान । गुरु भजनीं सावधान । सर्व भूतीं जनार्दन । अगम्य भजन भजूं लागे ॥ ३५ ॥ करूनि सद्गुरूची भक्ती । विमुक्तता लाधली प्राप्ती । तरी न सोडी गुरुभक्ती । अधिक प्रिती भजतसे ॥ ३६ ॥ येकनाथाचे उपकार । गुरूसी वाटले अपार । कांहीं घडावा प्रत्युपकार । म्हणोनि आज्ञाचर देव जाला ॥ ३७ ॥ पूर्ण सुख द्यावें भक्तास । म्हणोनी जाला त्याचा दास । भक्तीसी भुलला जगन्निवास । बारा वरुषें दास्यत्व केलें ॥ ३८ ॥ परतूनि यावें द्वारकेसी । हें विसरला हृषीकेशी । मधुवरि जैसी मासी । परतूनि तीसी रीघ नाहीं ॥ ३९ ॥ तैसे जाले कृष्णासी । गुंतला भक्त प्रेमरसीं । प्रतिष्ठानि ब्राह्मणवेशी । येकनाथापासी स्वयें असे ॥ ४० ॥ अखंड श्रीखंड उगाळित । श्रीखंड्या नाम तयातें । जन पाचारिती विनोदार्थ । तेंची त्यातें नाम पडलें ॥ ४१ ॥ तो श्रीखंड्या ब्राह्मण । खांदी कावडी वाहे जीवन । सर्व कामासी सावधान । तोची श्रीकृष्ण जाण पां ॥४२॥ तूं गेलिया प्रतिष्ठानासी । नमस्कारूनि येकनाथासी । विसर्जुनी अनुष्ठानासी । त्वरें प्रतिष्ठानासी जाई पां ॥ ४३ ॥ गुवां-- जाऊनि प्रतिष्ठानासी । नमस्कारूनि येकनाथासी । वळखुनी श्रीखंड्यासी । मिठी पायासी

पालावी ॥ ४४ ॥ ऐकूनि दृष्टांत वचन । मग विसर्जिलें अनुष्ठान । उघडूनि पाहे नयन । कोण्ही आन असेना ॥४५॥ मग करोनि कृष्ण स्मरण । दृष्टांत अनुभविला जाण । म्हणे कोठें आहे प्रतिष्ठान । कोण जाण मार्ग कैचा ॥ ४६ ॥ कैचा श्रीखंड्या ब्राह्मण । कैचा येकनाथ आपण । आमुचे जालें म्हातारपण । मार्गी गमन न करवे ॥ ४७ ॥ येथेंचि द्यावया दर्शन । काय आलें अशक्य आपण । आपण सर्वत्र परिपूर्ण । का चाळवण आम्हां केली ॥ ४८ ॥ अशक्त देखोनि म्हातारपण । देवें मांडिली चालन । अशक्त भक्ती देखोन । देव दर्शन नेदीचि ॥ ४९ ॥ येकनाथ तारुण्यपूर्ण । तारुण्य भक्ती प्रखर तीक्ष्ण । बळें बांधोनि नेला कृष्ण । केला अधीन सेवेसी ॥ ५० ॥ भला भेटला वस्ताद । मोठा ठकडा गोविंद । तें ठकडेपण जालें मंद । दोही खांद कुंभ वाहतां ॥ ५१ ॥ आम्ही केलें अनुष्ठान । आम्हांसी नेदूनि दर्शन । त्याचे घरीं वाहे जीवन । कोण भूषण जगामाजी ॥ ५२ ॥ म्हणे आमुचें कर्म कुंड ।

॥ ५४ ॥ तपस्व्यासी परम आवडी । कृष्ण दर्शनाची अति गोडी । स्वयें चाली लवडसवडी । आवडी गाढी कृष्णाची ॥ ५५ ॥ कांहीं रमत डोलत । कांहीं कण्हत कुंथत । हृदयीं कृष्णासी आठवीत । आला निश्चित प्रतिष्ठानासी ॥ ५६ ॥ गंगातिरीं करी स्नान । तव श्रीखंड्या देखिला नयन । खांदीं कावडी घेऊन । जाय आपण लगबगा ॥ ५७ ॥ अंतरीं वोळखुनी चिन्ह । तपस्वी निघे आपण । श्रीखंड्यास लक्षीत पूर्ण । चालिला जाण गृहासी ॥ ५८ ॥ श्रीकृष्णाचें करीत स्मरण । तपस्वी आला आपण । येकनाथें नमिले चरण । साधु संपूर्ण गृहा आले ॥ ५९ ॥ धन्य आजुचें जन्म । धन्य आजुचें नयन कर्म । प्रत्यक्ष पुरुषोत्तम । चालतें ब्रह्म गृहा आलें ॥ ६० ॥ म्हणोनि केला नमस्कारु । चरण क्षाळण पूजादरु । तपस्वी हरिखला थोरु । देखोनि आदरु पूजेचा ॥ ६१ ॥ म्हणे हा पूर्णस्थितीचा साधू । तरीच आला गोविंदू । हृदयीं मानुनी परमानंदू । स्वानंद सिंधू उचंबळे ॥ ६२ ॥ तपस्वी म्हणे येकनाथा । परम सभाग्य तूंचि आतां । विश्वव्यापका जगन्नाथा । भेटवी आतां लवकरी ॥ ६३ ॥ मी आलों द्वारकेहून । केलें कृष्ण मासीस अनुष्ठान । तेथें देवें सांगीतलें आपण । तुज भेट प्रतिष्ठानीं ॥ ६४ ॥ मज आज्ञा दिधली जाण । तुझा श्रीखंड्या ब्राह्मण । तो साक्षात् नारायण । संदेह जाण असेना ॥ ६५ ॥ त्याचे दुर्लभ श्रीचरण । ते मी पाहीन अवलोकुन । ... री भेटवी कृष्ण । स्वानंदपूर्ण सुखदाता ॥ ६६ ॥

ऐसे तपस्वी बोलता जाण । स्तंभासी उभा होता टेकून। ऐकोनि तपस्व्याचें वचन । जाला संपूर्ण अदृश्य तेथें ॥ ६७॥ तपस्वी बोले आपण। सत्वर भेटवी तो ब्राह्मण । तुझ्या घरीं वाटे जीवन । तो जगजीवन जगदात्मा ॥६८॥ऐकोनि या वचनाला। येकनाथ विस्मीत जाला।खेद कंप हर्षे दाटला। आलंगिला तपस्वी ॥ ६९ ॥ मग पाचारिले श्रीखंड्यातें । नेदीच प्रति शब्दातें । पाहा कोठें गेला म्हणत । धांडोळीत तयासी ॥ ७० ॥ सर्वांठायीं शोधिला। परंतु नाहीं उमगला । तत्क्षणीं गुप्त जाला । चाकाटला येकनाथ ॥ ७१ ॥ बारा वरुषें तत्वता । सेवा केली कृष्णनाथा । मज पासूनि नव्हेसी परता । आजि कां मरिता जालासी ॥ ७२ ॥ तुझ्या दर्शनाची आवडी । तपस्वी आला लवडसवडी । तुझी सगुण मूर्त्ति चोखडी । पहावया आवडी उल्हासें ॥ ७३ ॥ पुरली नाहीं दर्शन धणी । तपस्वी आनंदला दाटणी । येकनाथाच्या चरणीं । स्वयें लोळणी घातली ॥ ७४ ॥ प्रेमें दाटला येकनाथ । अष्टही भाव पुल्कांकित । आनंदजळ नयनीं स्रवत । मग उठवीत तपस्वियासी ॥ ७५ ॥ दोघे मौनावले पूर्ण । पडिलें ऐक्यतेचें आलिंगन । दोघामाजी श्रीकृष्ण । दिधलें दर्शन अंतरीं ॥७६॥ येकनाथ तोची श्रीकृष्ण । तपस्वी मानी आपण । तपस्वीच नारायण । दे आलिंगन येकनाथ ॥ ७७ ॥ आत्मानुभवें जाण । परस्परें कृष्ण दर्शन । समाधान जालें पूर्ण । तें सुख जाण अनुर्वाच्य ॥ ७८ ॥ कृष्णानुभवें आलिंगन । दोघांचें हार-

पलें दोनी पण । उरलें कृष्णरूप अभिन्न । ब्रह्म परिपूर्ण पूर्णत्वें ॥७९॥ त्या कृष्ण सुखासी उपमा । उपमितांचि लाजली उपमा । जेथें ब्रह्मत्वें नाठवे ब्रह्मा । तेथें उपमा निरुपम ॥ ८० ॥ ऐश्या कृष्ण सुखांत । तपस्वी आणि येकनाथ । स्वयें वर्तती सदोदित । आतां गुणस्मृतींत कोण पुसे ॥ ८१ ॥ जीवन दाहिलें आपुले घरीं । उपकार कोण मानी अंतरीं । लीला विग्रह श्रीहरी । नानापरी खेळ खेळे ॥ ८२ ॥ खेळ खेळोनि नाना-परी । सवेंची हारपे निर्विकारी । हरी जगाचा सूत्रधारी । सर्वांतरीं हरी येक ॥ ८३ ॥ ऐसा अनुभवोनि श्रीकृष्ण । तपस्वी पावला समाधान । वंदोनि येकनाथाचे चरण । आज्ञा घेवोन निघाला ॥ ८४ ॥ यापरी येकनाथ । भक्ती दाविली जगांत । भक्तिपाशीं देव तिष्ठत । हेंही निर्धात दाविलें ॥८५॥ दृढ बाणली आत्मस्थिती । तरी सोडीना गुरुभक्ती । सर्वाधि-ष्ठानीं गुरुमूर्ति । भजन पंथीं सादर ॥ ८६ ॥ सद्गुरु जैसे चालती । येकनाथ चाले त्याच पंथीं । जैसे सद्गुरू बैसती । त्याचि पद्धती आपण बैसे ॥८७॥ सद्गुरू जैसे जेविती । तैसेचि बैसोनि जेवी पंक्ती । सद्गुरूवीण आ गुमात्र क्षिती । आपमती चालेना ॥८८॥ सद्गुरू करिती जैसी निद्रा । येकनाथ साधी तेचि मुद्रा । गुरु वर्तती ज्या विचारा । त्याचि आचारा आचरतु ॥ ८९ ॥ वद्य षष्ठी फालगुनांत । जनार्दन गेले निजधामांत । ते दिवस साधोनि येकनाथ । ब्रह्म साक्षात होवोनि ठेला ॥ ९० ॥ क्षीर समुद्रीं भागीरथी । समरसली- अभिन्न

स्थिती । तैशी येका जनार्दनाची गती । ब्रह्मप्राप्ती येकत्व ॥९१॥ येका आणि जनार्दन । नामें गेलीं हारपोन । दोहींमाजि उरलेपण । तें संतांसी जाण पुसावें ॥९२॥ जें संतांसी पुसावें जाण । तें सर्वगत ब्रह्म पूर्ण । येका आणि जनार्दन । ब्रह्म पूर्ण होवोनि ठेले ॥९३॥ विश्वव्यापक चैतन्यघन । विश्वीं विश्व भरोनि उरलें आपण । उरले म्हणोनि वृंदावन । विराजमान गंगातीरीं ॥९४॥ येकनाथ प्रवेशले वृंदावन । तरी न सोडी जगजीवन । अश्वत्थरूपें नारायण । तिष्ठत जाण सेवेसी ॥९५॥ हें प्रतिष्ठान चरित्र निरूपण । जो करी अनुष्ठान । त्यासी येका जनार्दन । सुप्रसन्न सर्वदा ॥९६॥ हें अकरा अध्याय निरूपण । भक्तियुक्त करितां श्रवण । अथवा करितां पठण । येकादशी महिमान तो लाभे ॥९७॥ येकनाथ साधी अकरावा[1] आंख[2] । त्या नांव येकादशी देख । येकादशी धरुनि करितां लेख । अकरावा आंख पदीस पडे ॥९८॥ तो अकरावा आंख देखा । येकीं येकत्वें साधी येका । येकीं येक मिळोनि देखा । ब्रह्म सुख येका येकत्वीं मिळे ॥९९॥ ब्रह्म सुख भोक्ता येका । ब्रह्म स्वयंसिद्ध स्वयें

१ एकनाथस्वामींनीं अकरा ह्या आकड्याचें वर्म ओळखिलें होतें. जनार्दनस्वामी एक व त्यावर आपण एक मिळून अकरा. अकराव्या आकड्यापासून अकरावी तिथी पुढें येते त्यादिवशीं त्यांनीं देह ठेवला असें वरील ओंवींत सांगितलें आहे

२ अंक.





॥ श्लोक ॥

शालीवाहन पधरा शतशकीं एकाणवे विशती । वर्षनाम विकारि मास बरवा फाल्गुन वद्यप्रती ॥
षष्ठी वासर भानु या शुभदिना निर्याण स्वच्छंदता । पावे श्रीगुरु एकनाथचि महा स्वानंद-साम्राज्यता ॥

स्वराज्य गोसावी ह भ प आप्पाजा विदेशबुवा गोसावी उर्फ शंभूराव
इनामदार मौजे कर्नाळ संस्थान सांगली यांचे संग्रहा असलेले

## श्रीएकनाथमहाराजांच्या पादुकांचे आंगठे



### चरणांगुष्ठ महिमा

गुरोरंघ्रिपद्मे मनश्चेन्न लग्नं ततः किं ततः किं ततः किं ततः किम् ॥ — श्रीशंकराचार्य

येका । विश्व भरोनि उरला येका । येकीं येका येकत्वें ॥ १०० ॥ गुरुभजनीं भजला येका । भजतां गुरुरूप जाला येका । जनीं वनीं भरला येका । पूर्णत्वें येका परिपूर्ण ॥१०१॥ सत्यलोकीं खेळे येका । वैकुंठ भुवनीं विराजे येका । कैलास शिखरीं चढला येका । त्याहूनि येका येकत्वीं चढे ॥ १०२ ॥ आंत बाहेर अवघा येका । सगुण निर्गुण येकीं येका । मी तूंपण नाठवे येका । येकत्व येका समसाम्य ॥ १०३ ॥ माझे ठायीं मीचि येका । तुझे ठायीं तूंचि येका । दोहींमध्यें येक येका । येकत्वें येका सदोदित ॥ १०४ ॥ येकीं येकत्व पूर्ण । येकनाथ पूर्ण ब्रह्म पूर्ण । त्याचे सेवितां श्रीचरण । येकत्वें खुण बाणली ॥ १०५ ॥ जे येकनाथाचें करिती स्मरण । त्यांसी नाहीं जन्म मरण । जन्ममरणा आलें मरण । येकनाथ स्मरण मतापें ॥ १०६ ॥ जो प्रातःकाळीं उठोन । शुचिर्भूत करोनि स्नान । अकरा अध्याय संपूर्ण । नित्य जाण जो वाची ॥ १०७ ॥ अकरा दिवस पर्यंत । संपूर्ण पठावा हा ग्रंथ । त्याचे जे मनोरथ । श्रीयेकनाथ पुरवील ॥ १०८ ॥ हें प्रतिष्ठान चरित्र येकादशी । भक्तां घरीं हृषीकेशी । खेळ खेळूनि अहर्निशी । अंतरीं येकदेशीं गुप्त झाला ॥ १०९ ॥ म्हणे कृष्णदास जगदानंद । नंदन श्रीनाथ पदारविंद । सेवोनि चरण

मकरंद । सच्चिदानंद स्वयें जाला ॥ ११० ॥ इति श्री प्रतिष्ठान चरित्रे येकादशोध्यायः ॥ संपूर्णोस्तु ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

हस्त शके १७१७ राक्षस नाम संवत्सर आषाढ शुद्ध दशमी रविवारी तद्दिनीं समाप्त.
हस्ताक्षर शामभटात्मज रामभटेन लिखितं.
उद्धवात्मज शामजी गोसावी वठारकर तस्य पुस्तकं.
॥ येकनाथ ॥ शुभं भवतु ॥

॥ श्रीउद्धवार्पणमस्तु ॥



श्रीएकवीरा :　[ कार्ले ( लोणावळें ) येथील ]



श्रीएकनाथ महाराजांची कुलदेवता

श्रेष्ठ म्हणी कुळदेवता । जे का एकवीरा एकनाथा ।

## श्रीएकवीरा—श्रीएकनाथमहाराजांची कुलदेवता

श्रीएकवीरा ही श्रीएकनाथमहाराजांची कुलदेवता असून श्रीपरशुरामाची माता श्रीरेणुका तिचेंच स्वरूप होय, असें श्रीएकनाथमहाराजांनीं भागवताच्या अगदीं आरंभीं ६९ ते ७८ ह्या १० ओंव्यांत जें कुलदेवतेस नमन केलें आहे त्यावरून कळून येतें. सदरील ओंव्या येणेंप्रमाणें होत:—

" आतां वंदूं कुलदेवता । जे एकाकी एकनाथा । ते एकवांचून सर्वथा । आणिक कथा करूं नेदी ॥ एकरूप दाविलें मनीं । तंव एकचि दिसे जनीं वनीं । एकची कानीं वदनीं । एकपणीं एकवीरा ॥ ते शिवशक्तिरूपें दोन्ही । लेऊन मिरवे एकपणीं । एकपणें जाली गुर्विणी । प्रसवे एकपणीं एकवीरा ॥ ते एकरूपें एकवीरा । प्रसवली बोधफरशधरा । जयाचा कां दरारा । महावीरां अभिमानिया ॥ तेणें उपजोनि निवटली माया । आज्ञा पाळूनि सुरस दे पितया । म्हणोनि तो जाहला विजया॥ लवलाह्यां दिग्मंडळीं ॥ जो वासनासहस्रबाहो । छेदिला सहस्रार्जुन अहंभावो । स्वराज्य करूनियां पाहा हो । अर्पी स्वधर्मेवो स्वजातियां ॥ तेणें मारूनि माता जिवविली । तेचि कुलदेवता आम्हां जाहली । परी स्वनेंचें ख्याती केली । एकात्मबोलीं एकनाथा ॥ ते जैंपासूनि निवटिली । पासोनि प्रकृति पालटली । रागत्यागें शांत झाली । निजमाउली जगदंबा । त्या वोसंगा घेऊन । थोर दिधलें आश्वासन । विपमसंकटीं समाधान । नामस्मरण केलिया ॥ ते जयजय जगदंबा । उदो म्हणे ग्रंथारंभा । मतीमाजी स्वयंभा । योगगर्भा प्रगटली ॥ "—एकनाथी भागवत

## श्रीएकवीरा स्तवन व प्रार्थना

एकवीरा माते बहु करुणा केलें । दर्शन दिधलें मातृप्रेमें ॥ १ ॥
एकवीरा नाम माते सुजमती । दिल्हें देवीं संतीं वीचारूनी ॥ २ ॥
शिवशक्ति तूंची महाशक्ति एक । अनेकीं तूं एक एकवीरा ॥ ३ ॥
देईं संतसंगीं सदा समाधान । तीर्थ व्रत दान संतांपायीं ॥ ४ ॥
नयो मज कदां भजनाचा कंटाळा । प्रेमसुख सोहळा देईं देईं ॥ ५ ॥
अखिल मागणें मागतसें तुज । गुरूचें जें गुज देईं माते ॥ ६ ॥
ज्ञानें जागवूनी लावीं प्रेमस्तनीं । एकाजनार्दनीं जैसें केलें ॥ ७ ॥

—श्रीमंगेशसुधा

# श्रीदेवीचें अष्टक

## [ अर्थात् श्रीरेणुकाष्टक ]

अंबे महात्रिपुरसुंदरि आदिमाय । दारिद्र्य दुःसमय हारुनि दावि पाय ॥
तूझा अगाध महिमा वदती पुराणीं । श्रीरेणुके भगवती वर दे भवानी ॥१॥
आतां क्षमा करिसि वो अपराध माझा । मी मूढ केवळ असे परि दास तूझा ॥
तूं सोडशील मजला म्हणि वो निदानीं । श्रीरेणुके भगवती वर दे भवानी ॥२॥
लज्जा समस्त तुजला निजबाळकाची । तूं माउली अतिशये कनुवाळ साची ॥
व्हावें प्रसन्न मजला परिसोनि कानीं । श्रीरेणुके भगवती वर दे भवानी ॥३॥
निष्ठूरता म्हणि मनीं धरिसील आई । रक्षील कोण मज सांग उपाय कांहीं ॥
तूझाचि आश्रय असे जगिं सत्य मानी । श्रीरेणुके भगवती वर दे भवानी ॥४॥
तूं धन्य या त्रिभुवनांत सामान्य कैसी । धाके तुझ्या पळ सुटे रिपु दानवांसी ॥
येती पुजेसी सुर बैसुनियां विमानीं । श्रीरेणुके भगवती वर दे भवानी ॥५॥
नेणें पदार्थ तुजवांचुनि अन्य कांहीं । तूं मायबाप गणगोत अवघेंचि पाहीं ॥
आणीक देव दुसरा हृदयीं न मानीं । श्रीरेणुके भगवती वर दे भवानी ॥ ६ ॥
जाळीतसे बहुत हा भवताप अंगीं । याचें निवारण करी मज भेटि देगीं ॥
आनंदसिंधुलहरी गुणरत्न खाणी । श्रीरेणुके भगवती वर दे भवानी ॥ ७ ॥
हें घालिलें वय वृथा भुललों प्रपचीं । तेणें कडोनि स्थिरता न घडे मनाची ॥
दुःखार्णवांत बुडतों धरि शीघ्र पाणी । श्रीरेणुके भगवती वर दे भवानी ॥८॥
जैसें कळेल तुजला गुणपाळ त्यासी । मी प्रार्थितों सकळ जनांत साक्ष ऐसी ॥
गोसाविनंदन म्हणे मज लावि ध्यानीं । श्रीरेणुके भगवती वर दे भवानी ॥ ९ ॥

# श्रीकृष्णदयार्णवकृत श्रीएकनाथ–स्तोत्र

सप्रेमयुक्त घडली गुरुभक्ति माची । झाली कृपा सफल साध्य जनार्दनाची ॥
ब्रह्मैव बोध समता निजनिर्विकारी । श्रीएकनाथ विबुधा भरणावतारी ॥ १ ॥
पाहोनि देव यवनाकृति आर्त आले । श्राद्धान्न घालुनि तयांप्रति तृप्त केलें ॥
साम्य प्रशंसुनि सुतृप्त उमेश शौरी । श्रीएकनाथ विबुधा भरणावतारी ॥ २ ॥
यत्कीर्ति पुण्यसरिता कलिदोष नाशी । यत्संप्रदाय परमामृत दे जनासी ॥
जो कां वरें जडमुढां भजनेंचि तारी । श्रीएकनाथ विबुधा भरणावतारी ॥ ३ ॥
संपादिलें ऋण बहु द्विजभोजनासी । तें फेडिलें यदुवरें श्रुत सज्जनांसी ॥
केला ऋणी निजबळें भवबाधहारि । श्रीएकनाथ विबुधा भरणावतारी ॥ ४ ॥
श्रीखंडिया म्हणवि कृष्णचि ब्रह्मचारी । सर्वोपचार-जल वाहक टाळधारी ॥
सेवा सुखें विसरला स्वपदा मुरारी । श्रीएकनाथ विबुधा भरणावतारी ॥ ५ ॥
श्रीकृष्णदास नमितां जडलिंगमार्गि । केला उभा यम स्वयें रजनि प्रसंगीं ॥
तें युद्धकांड करवी परिपूर्ण हारी । श्रीएकनाथ विबुधा भरणावतारी ॥ ६ ॥
रामायणादि दशमातिल रुक्मिणीचें । केलें स्वयंवर फलप्रद वाक्य ज्याचें ॥
अध्यात्मतंतु न तुटे कविता प्रकारी । श्रीएकनाथ विबुधा भरणावतारी ॥ ७ ॥
वाराणसीत विदुषा मतिमान्य झाली । एकादशावरी टिका सुगमार्थ केली ॥
ब्रह्मीं स्वकर्म विनियोग जनोपकारी । श्रीएकनाथ विबुधा भरणावतारी ॥ ८ ॥
ब्रह्म प्रतीति प्रगटी भजनि द्विजाचा । दुष्ट घरींच हरि पादरजेंचि ज्याचा ॥
भूतीं दया भजन सर्वघटीं विचारी । श्रीएकनाथ विबुधा भरणावतारी ॥ ९ ॥
देहात्मभाव निरसी जडदृश्यरोधें । जीवात्मता विसरवी स्वरुपावबोधें ॥
लक्षांश जीव शिव ऐक्य दिप स्विकारी । श्रीएकनाथ विबुधा भरणावतारी ॥१०॥
हा एकनाथ दशकस्तव नित्यभावें । वाग्देवता प्रगटिता सकळार्थ पावे ॥
त्याला जगद्गुरु दयार्णव साह्यकारी । श्रीएकनाथ विबुधा भरणावतारी ॥११॥

---

# श्रीकेशवविरचित श्रीएकनाथ—स्तवन

## ओंव्या

परमार्थलीला विचित्र । दाउनी अद्‌भुत चरित्र ।
सद्भक्तिमार्ग पवित्र । स्थापिला स्वतंत्र जगदुद्धारा ॥ १ ॥
ऐसी करूनि ख्याति । स्वेच्छा आनंदस्थिति ।
श्रीएकनाथ परंज्योति । गेला निजधामाप्रति स्वलीला ॥ २ ॥
षड्‌गुणैश्वर्यसंपन्न । दाऊनि अवतार पूर्णपण ।
भक्तिवैराग्यज्ञाननिपुण । यश परिपूर्ण विस्तारिलें ॥ ३ ॥
ज्यांसी श्रीनाथाचें ध्यान । ज्यांसी श्रीएकनाथस्मरण ।
ज्यांसी घडलें चरणवंदन । तेही धन्य निजस्थिति ॥ ४ ॥
ज्यांसी मैत्री श्रीनाथासीं । श्रीनाथाचे सहवासी ।
श्रीनाथ निकट वासी । ते ते आम्हांसी परमवंद्य ॥ ५ ॥
ज्यांसी श्रीनाथाचें प्रेम । ज्यांसी श्रीनाथाचें दर्शन नेम ।
श्रीनाथचि ज्यांचें कर्म । ते ते परमपूज्य आम्हां ॥ ६ ॥
भाव असो नसो मनीं । परि ज्यांसी दर्शन अनुदिनीं ।
ते ते जाण सर्व प्राणी । पावनपणीं वंद्य आम्हां ॥ ७ ॥
श्रीनाथनिजात्मस्थिति । सद्गुरुकृपा ज्यांसी प्राप्ति ।
ते वंद्य गुरुमूर्ति । भाव निश्चितीं हा माझा ॥ ८ ॥
जेथें जेथें श्रीनाथकीर्ति । आदरें जे गुण वर्णिती ।
ते ते गुरुत्वें आम्हांप्रती । वंद्य होत निजभावें ॥ ९ ॥
यापरी समस्त जन । श्रीनाथदर्शनें पावन ।
त्यांसी माझें लोटांगण । हें विनवणें केशवाचें ॥ १० ॥

# श्रीएकनाथ नमस्कार-स्तोत्र

अधिष्ठान जेथें प्रतिष्ठान देखा । तिथें जन्मला तो गुणातीत एका ॥
जयाचेनि नामें चुके जन्म वेथा । नमस्कार माझा तया एकनाथा ॥ १ ॥
नदी दिव्य गोदातटींचा निवासी । सदा प्रीय जो सज्जनां वैष्णवांसी ॥
जया वर्णितां प्रेम आल्हाद चित्ता । नमस्कार माझा तया एकनाथा ॥ २ ॥
स्वयें भानु जो भानु आराधियेला । तयाचे कुळीं दीपकू दिव्य झाला ॥
हरीभक्ति लावोनि तारी समस्तां । नमस्कार माझा तया एकनाथा ॥ ३ ॥
चरित्रे विचित्रें पवित्रें अपारें । मुढें पामरें तारिलीं सुविचारें ॥
जयाचे कृपेनें समाधान चित्ता । नमस्कार माझा तया एकनाथा ॥ ४ ॥
लीलाविग्रहीं सर्वही निर्मियेलें । जिवां जीवनीं साधना योग्य केलें ॥
अनन्यास जो युक्तिनें मुक्तिदाता । नमस्कार माझा तया एकनाथा ॥ ५ ॥
जयाची जगीं कीर्ति विस्तारलीसी । जयाचेनि नामें महादुःख नासी ॥
जयाचेनि योगें घडे सर्व सत्ता । नमस्कार माझा तया एकनाथा ॥ ६ ॥
जेणें अर्चिलें द्विज देवासि नेमें । जेणें तारिलें विश्व हें रामनामें ॥
सदा सेवि जो सद्गुरु मोक्षदाता । नमस्कार माझा तया एकनाथा ॥ ७ ॥
जया नाम ना रूप ना गूण कांहीं । जया देह विदेह ना भास नाहीं ॥
बहू तारिले हस्त ठेवोनि माथां । नमस्कार माझा तया एकनाथा ॥ ८ ॥
जगीं एकला सद्गुरु एकनाथु । असे बोलती सर्वही विश्व मातु ॥
जया उपमा हो नये येक देतां । नमस्कार माझा तया एकनाथा ॥ ९ ॥
कवी नायकु दायकु सौख्यरासी । महा ज्ञानसिंधु असे नाम ज्यासी ॥
जयाते जगीं वर्णिति कीर्ति गाता । नमस्कार माझा तया एकनाथा ॥ १० ॥
अनंता गुणांचा नये वर्णिता हो । सदा दास तो श्यामवर्णि पाहा हो ॥
जयाचे मुखें नाम रूचे समस्तां । नमस्कार माझा तया एकनाथा ॥ ११ ॥
महासंत साधु प्रतिष्ठानवासी । स्मरा एकनाथा पदीं मुक्तिरासी ॥
जयाचे गृहीं कृष्णजी कार्यकर्ता । नमस्कार माझा तया एकनाथा ॥ १२ ॥

कलीमाजि हीना दिना उद्धराया । महाविष्णु अवतीर्ण झाले धराया ॥
जिहीं तारिलें हीन दीनां अनाथां । नमस्कार माझा तया एकनाथा ॥ १३ ॥
एकात्मता साधुनि जाण एका । एकादशाची करि शुद्ध टीका ॥
जनार्दनाचे प्रियपात्र पाही । त्या एकनाथा स्मरतों सदा ही ॥ १४ ॥
भानुदास कुलभूषण भक्तिचें । एकनाथ निज दैवत आमुचें ॥
जन्ममृत्यु सकलांसहि वारितें । एक नाम कुजनांसही तारितें ॥ १५ ॥

---

## श्रीएकनाथांची आरती

*आरति एकनाथा । महाराजा समर्था ॥*
त्रिभुवनिं तूंचि थोर । जगद्गुरु जगन्नाथा ॥ आरति ० ॥ १ ॥
'एकनाथ' नाम सार । वेदशास्त्रांचें गुज ॥
संसारदुःख नासे । महामंत्राचें बीज ॥ आरति ० ॥ २ ॥
'एकनाथ' नाम घेतां । सुख वाटलें चित्ता ॥
आनंद गोपाळदासा । धणी न पुरे गातां ॥ आरति ० ॥ ३ ॥

॥ दत्तात्रेय जनार्दन श्रीएकनाथ ॥

# परिशिष्ट

(करवीर येथील शिवछत्रपतिमहाराज यांचेकडून ह. भ. प. उद्धव बिन गणेश गोसावी यांना वटार गांवची मिळालेली सनद)

श्री

श्रीएकनाथ

इ. सन. १७०५




स्वस्ती श्री राज्याभिशेक शक ३२ पार्थीवनाम संवत्छरे पौष्य शुद्ध दशमी भृगुवासरे क्षत्रीय कुलावतंस श्री राजा शिव छत्रपति

| शिक्का | शिक्का |
| --- | --- |

यांणीं राजश्री उद्धव बिन गणेश गोसावी यांस. दिल्हे दानपत्र ऐसाजे. तुम्ही स्वामी सनीध येऊन विदीत केले कीं आपण श्री स्वामीचे नातु पैठणी आजिवरी स्वामीचा मठ आहे तेथें राहात होतो. सालात यात्रांते खडक लाटीस येऊन राहिलो आहो. श्रीस्वामींची पुण्यतिथ व उत्छह करून प्रतिवर्षी पंढरपुरची यात्रा करून महाराजाचे राज्यास कल्याण चिंतून आहो. ऐसासी श्री-स्वामीची पुण्यतिथ व उत्छव सांगाचा कर्णास कांहीं महाराज इनाम करून दिधली यानें श्रेय विशेश होय. आपलाही वंश श्रीचा आहे. म्हणून त्यावरून स्वामीनें मनास आणितां श्री बहुत थोर परमेश्वर परायणें यांची पुण्यतीथ व उत्छव सांग चालिल्यानें स्वामीच्या राज्यास व स्वामीस कल्याण आहे याकरितां हल्ली स्वामीनें तुम्हांस श्रीच्या पुण्यतिथीस व उत्छाहास नूतन इनाम कुलबाद कुलकानु देखील हल्लीपटी व पेस्तरपटी जलतरु पाषाण पडिले पान

सद्दीत खेरीज हकदार व इनामदार करून मौजे वटार तावड ता। आळते सुभा प्रांत पन्हाळा हा गाव इनाम सर्वमान्य करून दिल्हा आहे. तरी तुम्ही मौजे मजकूर आपले दुमाला करून होऊन इनाम आपल्या वंशपरंपरेनें अनभऊन श्रीची पुण्यतिथ व उत्छह चालवून सुखरूप राहणे. जाणिजे लेखनालंकार.

शिक्का

रुजू शिक्का

तेरीख ८ माहे रमजान रमजान सुमाशित मैयावरि सुमामुद थार

---

वटार येथें असलेली "प्रतिष्ठान—चरित्र" ग्रंथाची प्रत तयार करणारे
रामभटात्मज रामभट यांचें हस्ताक्षर

प० ८३ रणमकरंद सच्चिदानंद स्वयेजाला १० इतिश्रीप्रतिष्ठा अ० ८८
नचरित्रे एकादशोध्यायः संपूर्णमस्तु कस्तापीमानस्त
॥ ओं॥ श्रीराम वैद्य ११० ॥ [illegible] ॥
॥ ११॥ हस्त शके १७ [illegible] राक्षसनामसंवत्सर आषाढ [illegible]
रविवारी तद्दिनी समाप्त ७ हस्ताक्षर रामभटात्मज
शिव रामभट लिखितं उत्तरा [illegible] गोसावि
[illegible] तस्य पुस्तकं ॥ यदुनाथ १ शुभं भवतु
[illegible] कटिग्रीवा ऊर्ध्वदृष्टी अधोमुखं कष्टनालिखितं ग्रंथं
[illegible] प्रतिपालयेत् १ तैलाद्रक्षेत् जलाद्रक्षेत् [illegible]
[illegible] हस्तेन [illegible] ८ श्रीराम जयराम ॥ ८३
जय जय राम

१०२२
१२०
१२२२

**श्रीरामचन्द्र शंकर टाकी बी ए उर्फ श्रीभाई**

( डेप्युटी एज्युकेशनल इन्स्पेक्टर मुंबई ) यानीं लिहिलेले मराठी व इंग्रजी ग्रंथ*

( १ ) " **पुरुषार्थदीपिका.** "—यात परमार्थप्राप्तीकरता काय केलें पाहिजे हे श्रुति, स्मृति, पुराण व अनेक साधुसंत यांच्या वचनाधारें पाच उल्लासांत दाख विण्यात आलें आहे पृ स ७०९, बांधणी कापडी, किं. रु ३, ट ख वेगळा

" मानवी जीविताचें अंतिम ध्येय व साध्य काय आहे व हें ध्येय कसें साधावें, हें दर्शविण्यासाठींच पुरुषार्थदीपिकेचा प्रयत्न आहे "—महाराष्ट्र-सारस्वत

" या ग्रंथात ज्ञानयोगापेक्षा भक्तियोग श्रेष्ठ आहे, ही गोष्ट मुख्यत प्रतिपादिली आहे आणि त्याच्या समर्थनार्थ संस्कृत, इंग्रजी आणि मराठी ग्रंथा तून भरपूर आधार दिले आहेत मुमुक्षूस हा ग्रंथ अत्यंत प्रिय वाटेल "

—विविधज्ञानविस्तार

( २ ) " **ज्ञानेश्वरमहाराज** अथवा **सद्भक्तिविजय.** "—या ग्रंथात श्रीज्ञानेश्वरमहाराजांचें चरित्र व त्यांचें अवतारकार्य यांचें विवेचन नऊ समासांत केलें असून पाच सुंदर चित्रेही दिलीं आहेत पृ स २२०, बांधणी कागदी, किं १ रु ८ आणे, ट ख वेगळा

" संतमाहात्म्य, नामप्रताप, ज्ञानेश्वरमहाराज व त्यांच्या भावंडांच्या अवताराचें कारण, हठयोग्याच्या बडाचा मोड, सद्भक्ति-पुनरुज्जीवन, भावार्थ दीपिकेचें स्वरूप, अमृतानुभव, गुरुदेवभक्तिक्रम व वैकुंठारोहणाचें अलौकिक वैभव अशा नऊ प्रकरणांत ही प्रवचनमालिका गोंवण्यात आली आहे भगवद्भक्ति मार्गाची गोडी असणाऱ्यांना हें पुस्तक आवडल्यावाचून रहाणार नाही."—नवाकाळ

( ३ ) " **श्रीशंकरसुधा.** "—गुरुवर्य श्रीभाईंनीं स्वयस्फूर्तानें लिहिलेल्या २१३ पद्यांचा हा संग्रह असून यांत शेवटीं श्रींच्या ५ इंग्रजी बोधवचनांचाही (sayings) समावेश झाला आहे यांतलि वरीचशीं पद्यें परमार्थांतील गहन विषयावर चांगलाच प्रकाश पाडणारीं अशीं झालीं आहेत पृ स ८०, बांधणी कागदी, किं रु २

(४) यांशिवाय "**सद्भक्तिपंथ,**" किं ४ आणे, (५) "**सद्भक्तिपंथ अर्थात् जगद्वंद्यपथप्रदर्शक श्लोकद्वय,** " किं ३ आणे, ( ६ ) **श्रीनारायण महाराज जालघणकर यांचें स्रोटक चरित्र,** " किं २ आणे.

---

* हे व पुढील पृष्ठावरील ग्रंथ मिळण्याचा पत्ता —ट्रिनिटी पब्लिसिटी सोसायटी, श्रीशंकर लॉज, सरस्वती बाग, जोगेश्वरी, मुंबई

(1) **Amourism or Premamrita** —This is quite a readable and inspiring book on the subject of Devotional Love containing learned and yet easily intelligible discourses on the only safe path to Salvation Pages 255 Price Cloth bound Rs 3/- Paper bound Rs 2/- Postage extra

> This is a learned treatise on the Religion of Love The whole book breathes a spirit of catholicity which is rather rare to meet with in works of this type The author supports his conclusions by numerous quotations from the scriptures and sayings of the saints and teachers of all religions Passages from the works of renowned philosophical and religious writers of the West have also been freely quoted —*Prabuddha Bharat*

(2) **De Carmine Dei Deorum or on The Song of the God of Gods** —This is an exhaustive Commentary in English on the Bhagavad-Gita in three Volumes Pages *1205 Price Cloth bound Rs 10/-* Paper bound in one *Volume Rs 7/- Postage extra*

> These books are of the most learned and deep character throw a wonderful light on the Hindu Systems of Philosophy and Theosophy and show in many places the beauty of your ancient Vedas I am very proud to be the possessor of such grand books I have given them to read to a University Professor and while he has not read them through yet he has told me that it is a great pity that such a wonderful book should be nearly unknown in Europe —*Mr Rag L G Zopegni Corino Italy*

Besides

**(3) Religion of Mankind Pp 30 As 2 (4) Wonderful Reconciliation of Tradition and History or Shri Rama Krishna and Lord Jesus Christ Pp 13 As 2 (5) Religion of Love or World Religion Pp 40 As 4 (6) A National Prayer As 2 (7) A Comparison between the Path of Eternal Religion and Eternal Love As 2**

## श्रीमंगेश रामचंद्र टाकी उर्फ श्रीदादाभाई यांनीं लिहिलेले ग्रंथ

" श्रीगीताध्याय सारामृत "—( ' षडध्यायी-प्रथमभाग अर्थात् ईश्वर-विषयक अथवा ब्रह्मात्मक ज्ञान ' ) प्रस्तुत ग्रंथ श्रीभाईंच्या श्रीभगवद्गीतेवरील इंग्रजी टीकेच्या धर्तीवर लिहिला गेला असून त्यांतील प्रमाणेच पहिल्या सहा अध्यायाचा हा प्रथमभाग ईश्वर-विषयक अथवा ब्रह्मात्मक ज्ञान ( Theology or the Science of God ) ह्या नावाने प्रसिद्ध केला आहे इंग्रजी भाषेच्या ज्ञानाच्या अभावामुळे ज्यांना श्रीभाईंचा इंग्रजी ग्रंथ वाचता येणार नाही त्यांना हा ग्रंथ वाचून श्रीभगवद्गीतेचा यथार्थ बोध होईल यात संशय नाही यांत समर्पण, अनुक्रमणिका, मंगल चरण, प्रस्तावना, विषयप्रवेश, उपोद्घात वगैरे प्रकरणांचा समावेश झाला आहे. पृ स १८०, बायंडिंग साधें, किं रु २

" श्रीतुकाराममहाराज आणि शिवछत्रपतींचें वैराग्य ' —जोगेश्वरी येथील सद्भक्ति-मंदिरांत भगवताच्या अगर थोर संतविभूतींच्या वचनामृताच्या होत असलेल्या लळीतांसाठींच या ग्रंथाची रचना झालेली असून मंदिरांतील महोत्सवसमयीं या कथेच्या लळिताचे प्रयोग अनेकदां करून दाखविण्यात आले आहेत भक्ति-ज्ञान-वैराग्याचें वाग्वैभव कोमल अंतःकरणांत बाजारोंण व्हावें हाच या ग्रंथाचा हेतू असल्यामुळे तो आबालवृद्धांना उपयोगी पडण्यासारखाच झाला आहे पृ स ३८, किं ६ आ, ट स वेगळा

" सद्भक्ति-प्रकाश "—*या अत्यंत उद्बोधक मननीय व भक्तिरसपरिप्लुत* तिमाही पारमार्थिक मासिकांत सद्भक्तींत समाविष्ट होणारीं व श्रुति-स्मृति-पुराणें *व साधुसंत यांस संमत असलेल्या भाक्तसाधनें जीं ' भक्ति ज्ञान-वैराग्य ' त्यांना* परिपोषक असेच विषय घेतले जातात यांत कोणत्याही अन्य संप्रदायावर अगर धर्मावर टीकात्मक लेख येत नाहींत मासिकाच्या अंतरंगासारखेंच त्याचें बाहिरंगही फार मोहक असतें वर्षारंभ ऑक्टोबरपासून होतो तथापि वर्गणीदार केव्हांही होतां येतें वार्षिक वर्गणी फक्त रु ३–१–०

" भगवद्भजन "—या लहानशा पुस्तकांत श्रीवामनपंडिताच्या भगवद्गीता-वरील समश्लोकींतील अठरा–अध्याय–सार–श्लोक व त्यांचीं करुणाष्टकें, तसेंच श्रीनारायणमहाराजांचीं गुरुपादुकाष्टक, बोधाष्टक, चिद्रत्नमाला व विचारमाला हीं सर्व आली असून, श्रीरामदासस्वामी व श्रीशिवरामस्वामी यांच्या ' भूपाळ्या ', श्रीएकनाथमहाराजांची ' संध्या ', श्रीतुकाराममहाराजांची ' पूजा ' व श्रीमोहिरोबादि संतांचीं

